...प्राइझ कमिटीनें बक्षिस दिलेलें,

व

श्रीमंत महाराज सयाजीराव गायकवाड समशेर बहादूर यांनीं आश्रय दिलेलें,

हरी रामचंद्र पाठक वैद्यकृत

# सद्यस्थित्यादर्शी नाटक.

अर्थात्

## आजची आमची सामाजिक स्थिती.

( प्रतिबिंब पहिलें. )

---

मुंबई, गिरगांवांत " शारदाक्रीडन " छा. छा.

---

किंमत एक रुपया.




दक्षिणाप्राईज कमेटीकडून बक्षिस मिळालेलें

व

श्रीमंत महाराज सयाजीराव गायकवाड समसरबहा-
दर सेनाखासखेल यांजकडून आश्रय मिळालेलें.

# सद्यस्थित्यादर्श नाटक.

अर्थात्

## आजची आमची सामाजिक स्थिति.

( प्रतिबिंब पहिलें )

हें

पुस्तक

**हरी रामचंद्र पाठक वैद्य**

यांनीं केलें

तें

मुंबई येथें

शारदाक्रीडन छापखान्यांत छापून प्रसिद्ध केलें.

शके १८१८ सन १८९६ .

किंमत एक रुपया.

हें पुस्तक आमच्या आर्यदेशीय आबाल
वृद्ध स्त्रीपुरुषांस ग्रंथकर्त्यानें
अति नंम्रतेनें नजर
केलें असे.

ग्रंथकर्ता.

# प्रस्तावना.

इतिहास, पुराणें, व चरित्रें हीं जशीं मनुष्याच्या अनुभवरत्नांचीं भांडारें आहेत, तद्वत् चांगल्यावाईट गोष्टींचें प्रत्यक्षप्रमाणांसह प्रत्यंतर दाखविणारें नाटक हें होय. ज्याप्रमाणें उत्तम चित्रकार आपल्या कृतीनें एखाद्या स्थळाचा हुबेहुब देखावा दाखवून प्रेक्षकांस त्यांतील सृष्टिवैचित्र्याचा उत्तम प्रकारें बोध करून देतो, त्याप्रमाणें नाटक हें मनुष्याच्या स्थितिवैचित्र्याचा आनंददायक व सुविचारदर्शक देखावा दाखविणारें होय. मृच्छकटिकादि आमच्या आर्यनाटककारांचा तर काय परंतु, पाश्चात्य कवि शेक्सपीयरासारख्या उत्तम नाटककारांचाही हाच हेतु असावा असें त्यांच्या कृतींवरून सिद्ध होतें. त्यांच्या मतें नाटकाच्या योगानें मनुष्याच्या मनाचें रंजन होऊन त्यांस सद्बोध होतो. आजच्या आमच्या समाजच्या सद्यस्थितीचें लक्ष्यपूर्वक निरीक्षण केलें असतां असें दिसून येतें कीं, सामाजिक सुधारणें संबंधानें उंच वर्णांत बरीच दुही माजली आहे. वर्तमान पत्रांतही नव्या जुन्या मतांची बरीच भवति न भवति चालली आहे. परंतु दोन्ही पक्षांतील मतांमध्यें सत्यता किती आहे हें कळून येण्यास ज्ञानाचा व अनुभवाचा उपयोग करावा लागतो. ह्याकरितां दोन्ही पक्षांचीं पात्रें योजून सुधारणेच्या मुख्य मुख्य मुद्यांचा ह्या नाटकांत विचार केला आहे.

सदर्हु पुस्तक लिहीत असतां माझे परम मित्र रा. रा. बाळकृष्ण बापू आचार्य, मोरो विनायक शिंगणें, गोपाळ नारायण जोशी, सखाराम रघुनाथ पुरंदरे व रा. रा. विश्वनाथ गणेश केळकर या सद्गृहस्थांनीं वेळोवेळीं प्रोत्साहन देऊन ज्या सूचना केल्या त्यांबद्दल मी त्यांचा फार आभारी आहें.

तसेंच दक्षिणाप्राईज कमेटीनें बक्षीस देऊन ज्या योग्य सूचना केल्याबद्दल मी कमेटीचा व श्रीमंत महाराजा सयाजीराव गायकवाड यांनीं जो मला आश्रय दिला त्याबद्दल त्यांचा मी अत्यंत आभारी आहें. आणखी येथें इतकें कळविणें भाग आहे कीं, दिवाणबहादूर मणीभाई जसभाई यांनीं उत्तेजनार्थ ह्मणून जी मदत केली याबद्दल त्यांचा मी फार उपकारी आहें.

शेवटीं आमच्या प्रिय वाचकांस येवढीच विनंति आहे कीं, ह्या माझ्या अल्प प्रयत्नांत जे दोष त्यांना आढळून येतील त्यांजकडे लक्ष्य न देतां ह्या कृतींत जे कांहीं गुण दिसतील त्यांचें ते ग्रहण करतील अशी आशा आहे.

ग्रंथकर्ता.

---

# शुद्धिपत्र.

| पृष्ठ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|
| १ | धर्मच्छेदका | धर्मोच्छेदका. |
| २७ | विधीसूत्र | विधिसूत्र. |
| २८ | तेवढेच | तेवढेंच. |
| २९ | ईश्रानें | ईश्वरानें. |
| ३१ | धरण्यान | धरण्यांत. |
| ३५ | ३ ला | ३ रा |
| ३९ | भरण्याचा | भरविण्याचा |
| ४० | त्याचा | त्यांचा |
| ४२ | भरा | करा |
| ४८ | द्यावा | सांगावा. |
| ४९ | ना?तवंड्याची | नातवंड्याची. |
| ५० | नन्हे | नव्हे. |
| ५१ | येयढ्या | येवढ्या. |
| ५२ | सुखान | सुखानें. |
| ५२ | नांदात | नांदोत. |
| ५२ | सदांचा | सदांच. |
| ५३ | लाचते | लाजते. |
| ५९ | हात | होत. |
| ६१ | जुगणार | जुळणार. |
| ६२ | शनमार्थ | शमनार्थ. |
| ६३ | जल्मास | जन्मास. |
| ६४ | करतील | देतील. |
| ६४ | जल्माचे | जन्माचे. |
| ६५ | सोई | सोय. |

| | | |
|---|---|---|
| ७२ | नाहीं | नाहींत. |
| ७४ | त्या | त्यांना. |
| ८० | सवाशीण | सुवाशीण. |
| ९२ | उंवपणा | उंचपणा. |
| १०५ | कठून | कोठून. |
| १०६ | कृष्ण० | ( मनांत ह्मणतात. ) |
| ११२ | लक्ष | लक्ष्य. |
| ११२ | देते | देतो. |
| ११३ | भीका | भीक. |
| ११७ | मुलींचे | मुलींच्या. |
| ११९ | सुधरवेल | सुधारवेल. |
| १२१ | कायत | काय ते. |
| १३२ | दुसऱ्याला | दुसऱ्यांच्या. |
| १३२ | दोनी | दोन्ही. |
| १४४ | रुढि | रुढ्या. |
| १४८ | मा | मी. |
| १५३ | कंन्या | कन्या |

१५५ श्लोकांत, कीर्तीचा ध्वज द्वारीं असें झालें तेथें दारीं असें वाचावें.

# नाटकांतील पात्रें.

## पुरुषपात्रें.

( शास्त्री व भिक्षुकमंडळी )

कृष्णशास्त्री–मुख्य नायक.

गणेशशास्त्री–एक शास्त्री.

चक्रंभट बेंद्रे–सनातनधर्मप्रसारकब्रह्मसभेचे चिटणीस.

बचंभट भुसकुटे एक भिक्षुक.

पिलंभट गोमुखे बचंभटाचे जांवई

मोरभट पुराणिक–कन्याविक्रयाचा दलाल.

सखारामभट–यमुनेच्या सासरचा उपाध्या.

विठ्ठलभट पुराणिक–सगुणीला पुराण सांगणारा.

मन्शारामशास्त्री.<br>उत्तमभट पुराणिक. } गुर्जरशास्त्री

शंकरभट जोशी.<br>सदाशिवभट.<br>गणेशभट.<br>व्यंकय्या.<br>रामभट. } सनातनधर्मप्रसारक ब्रह्मसभेस आलेली मंडळी.

गोविंदशास्त्री–एक शास्त्री.

सितंभट<br>महादेवभट } भिक्षुकमंडळी.

मार्तंड–बचंभटाचा मुलगा गणेशशास्त्र्यांचा जांवई.

बापुसाहेब नातवंडे वकील–विनायकरावांचा सासरा.

विनायकराव–कृष्णशास्त्र्यांचा भाचा व बापुसाहेबांचा जांवई.

गोपाळराव–बापुसाहेबांचा मेहुणा.

दामुअण्णा–बापुसाहेबांचा मुलगा.

### इतर पात्रें.

रस्त्यांतून जाणारा एक गृहस्थ.

विश्वासराव घोरपडे } विनायकराव व गोपाळराव यांचे स्नेही
बाळकृष्णपंत

पोलीसजमादार

दोन पोलीसशिपाई

सदू
गणू } –न्हावी.
विठू

## स्त्रिया

राधाबाई–कृष्णशास्त्र्यांची बायको.
यमुना–कृष्णशास्त्र्यांची मुलगी.
सावित्रीकाकू–यमुनेची सासू.
कुशी व दुर्गी–यमुनेच्या नणदा.
सगुणी–बचंभटाची मुलगी व पिलंभटाची बायको.
पार्वतीबाई–सगुणीची आई व बचंभटाची बायको.
ठकी व वाराणशी–सगुणीच्या मैत्रिणी.
काशीबाई–बापुसाहेबांची बायको.
सुशिला–काशीबाईची मुलगी.
चिमुताई व सखुताई–सुशिलेच्या मैत्रिणी.
लक्ष्मीबाई–पासझालेली सुईण.
साळूताई, ठमाबाई, विठाबाई पुराणाला येणाऱ्या विधवास्त्रिया व रंगुताई पुराणाला येणारी एक सुवाशीणबाई.

( फक्त ज्यांची नांवें आलीं आहेत अशीं स्त्री पुरुष पात्रें. )
आबासाहेब निमुळते–यमुनेचा सासरा.
आपासाहेब दिघे–एक श्रीमंत गृहस्थ.
नागूभट–आबासाहेबांकडे येणारा एक भिक्षुक.
दत्तु–आबासाहेबांचा नातु, कुशीचा मुलगा.
गंगू–पिलंभट गोमुख्यांची मुलगी.
उमाकाकू–यमुनेच्या शेजारीं राहणारी एक बाई.

---



# सद्यस्थित्यादर्श नाटक

अर्थात्

## आजची आमची सामाजिक स्थिति.

## अंक पहिला.

### प्रवेश १ ला.

**स्थळ**–मुंबई–कृष्णशास्त्र्यांचें घर.

**पात्रें**–कृष्णशास्त्री (मुख्य नायक) आणि बचंभट भुसकुटे (एक भिक्षुक)

**कृष्णशास्त्री**–( हातांत आर्यमहिलोन्नतिदिग्दर्शन नांवाचें मासिक पुस्तक घऊन प्रवेश करितात. )

**कृष्णशा**–( स्वतःशींच रागानें ) हा मूर्खा, धर्मच्छेदका, कुलांगारा, आपल्या मावलीला व्यर्थ शिणवून ह्या आमच्या पुण्यवान् भरतभूमीला भार मात्र झालास! शिव, शिव, धर्मनाश! धर्मनाश! धर्मनाश! ( बसतात ) हर! हर! आमच्या धर्मप्रवर्तकांनीं कलियुगाचा महिमा ह्मणून जो कांहीं

लिहिला आहे तो कांहीं खोटा नाहीं. जो उठला तो ह्मणे सुधारणा करा! सुधारणा करा! ह्याशिवाय गुलामांना दुसरें तिसरें कांहींच दिसत नाहीं. बरें, ती सुधारणा तरी कसली? तर **विधवांचीं लग्नें, बालविवाहनिषेध, विधवाकेशवपनखंडन, स्त्री-शिक्षणास उत्तेजन, स्त्रियांना पुरुषांप्रमाणें मोकळीक देणें** इत्यादि. एक का दोन! सांगावीं तेवढीं थोडीं!! एकंदरींत धर्मनाशावांचून दुसरी गोष्टच ऐकू येत नाहीं. एवंच, हल्लींच्या काळांत ज्याला त्याला स्वधर्माचा अगदीं कंटाळाच येऊन गेला आहे. त्यांना दुसरें तिसरें कांहींच सुचत नाहीं. जावें तेथें ह्याच गोष्टी! अजून ठाऊक नाहीं, बेट्यांनीं दूध पाहिलें आहे, पण बडगा कुठें ठाऊक आहे? नाचा ह्मणावें किती नाचतां ते! पण, थांबा गुलामांनों, हा कृष्णशास्त्री तुमचा बाप लागून गेला आहे. श्रीपर्यंत गेलों नाहीं तोंपर्यंतच्या ह्या सगळ्या गोष्टी! ( इतक्यांत बचंभट पागोट्याचा सुटलेला पदर सांवरीत प्रवेश करतात. )

**बचंभट भुसकुटे**—अलिकडे भिक्षुकीच्या धंद्याची मोठी पंचाईत झाली आहे. आज सगळ्या आठां दिवसांत दक्षिणेचा छदाम कसा तो पाहिला नाहीं. अशानें हा संसार चालावा तरी कसा? पण, ( पागोट्याचा पदर खोंचून ) पदर एकाएकीं सुटल्यामुळें कांहीं लाभ होण्याची आशा दिसते. ( पुढें पाहून. ) अरे! तें शास्त्रीबोवांच्या ओटीवर कोण बरें बसलें आहे? (जरा पुढें जाऊन) हो, शास्त्रीबुवाच. ठीक झालें. जरा भेटून मग पुढें जावें. ह्मणजे परवांच्या प्रायश्चि-

त्ताच्या शास्त्रार्थासंबंधाचा काय निकाल लागला तोही कळेल. (जवळ जाऊन) नमस्कार शास्त्रीबुवा. कसें काय? ठीक आहेना?

**कृष्णशास्त्री**– (बचंभटाकडे पाहून) नमस्कार. या, या. बचंभटजी असे या. ( बचंभट बसतो व त्यास कृष्णशास्त्री जरा जवळ घेऊन) कां बचंभटजी, आज येवढ्या दुपारींच कुठें?

**बचंभट**–नाहीं–ह्मटलें निघालों होतों जायला जरा भायखळ्याच्या बाजूला, तेव्हां ह्मटलें जरा वळावें आणी आपली भेट घेऊन मग पुढें जावें.

**कृष्णशास्त्री**–अहो बचंभटजी, आतांशा गांवांत काय बंडाळीं चालली आहेत तीं समजलीं का आपणाला? ह्या सुधारकांनीं तर धर्माचा सत्यानाश मांडला आहे.

**बचंभट**–काय? धर्माचा सत्यानाश! खरेंच कीं काय?

**कृष्णशास्त्री**–'खरेंच कीं काय' ह्मणजे?

**बचंभट**–मग ह्याला उपाय?

**कृष्णशास्त्री**–उपाय कसला? हें प्रकरण श्रीपर्यंत घेऊन जातों. त्या शिवाय ह्यांची खुमखुम् मोडणार नाहीं. पहिल्यानें वाटलें होतें कीं; उगीच अशा क्षुल्लक कामांत श्रीला त्रास देऊं नये, पण तेथपर्यंत न जाऊन करणार कसें? हीं इंग्रजी शिकलेलीं कारटीं हवीं तशीं नाचताहेतना! पण पहा तर खरे त्यानां कसे वठणीस आणतों तें! काय समजले आहेत? त्यांचे ते चाळे त्यानांच बरे दिसतात.

फार लांब कशाला? तुमचे यजमान **बापुसाहेब नातवंडे** वकील हे त्यांचे गुरु. ह्या एवढ्या वड्या व पोक्त मनुष्याला कांहींच समजूं नये हें मोठें आश्चर्य आहे. अशा लोकांना ह्मणावें तरी काय? त्यांचे ते थोरले चिरंजीव दामू; नुकतेच कुठें बी. ए. का फीए झाले आहेत. आणि ह्मणे आमच्या देशांतील स्त्रिया सुशिक्षित व्हाव्या ह्मणून कुठें "आर्यमहिलोन्नतिदिग्दर्शन" नांवाचें मासिक पुस्तक काढीत आहेत, त्यापैकींच हा एक अंक. (असें ह्मणून पुस्तक बचंभटापुढें आपटतात.) आमचा भाचा **विनायक** सकाळीं बसला होता वाचीत; तों माझें संध्यावंदनादि सर्व आन्हिक आटोपून नित्यक्रमाचा भगवद्गीतेचा पाठ ह्मणत एकादशीच्या फराळाची तयारी झाली नव्हती ह्मणून सहज ओटीवर आलों व पाहातों तों हा कांहीं पुस्तक वाचीत बसला आहे. ह्मणून सहज विचारलें कीं, हें कसलें रे पुस्तक? तोंच त्यानें तें मिटलें, तरी देखील मी त्याजकडून घेतलेंच.

**बचंभट**– तेव्हां तें आपण वाचलेंच असेल!

**कृष्णशास्त्री**--छेः हो वाचायाचें नांव कशाला! मी असलीं पुस्तकें वाचीन ह्मणतां?

**बचंभट**–मग त्यांत काय लिहिलें आहे, हें समजलें तरी कसें?

**कृष्णशास्त्री**–वाचायलाच का पाहिजे? असल्या पुस्तकांत काय असणार तें आपणांस समजतेंच आहे.

नेहमीं जें आपण इतर सुधारकांच्या तोंडून ऐकतों तसलीच वाचालता-अर्थात् आमचे लोक बालविधवांचीं लग्नें करीत नाहींत, त्यांच्यावर धर्मबाह्य जुलूम ह्मणजे त्यांचें केशवपन करवितात वगैरे बाष्कळ लेख असणार, दुसरें काय? आपल्या विषयप्रतिपादनाचे समर्थनार्थ हे लोक हवा तसा अर्थही फिरवितात. सारांश "एनकेन प्रकारेण" आपलें मत स्थापावयाचें आणि लोकांच्या डोळ्यांत धूळ टाकून त्यांचीं मनें कलुषित करावयाचीं. एवंच, त्यांस धर्मद्वेष्टे बनवून आपला मतलब साधावयाचा! आग लावा असल्या पुस्तकांना! लोक कांहीं कां करीनात! मी तर **विनायकाला** अशी सक्त ताकीद दिली आहे कीं, खबरदार, पुनः असलीं पुस्तकें घरांत आणलींस तर!! या उपर आमचें ऐकणेंच नसेल तर तुला दाही दिशा मोकळ्या आहेत.

**बचंभट**—एकंदरींत विपरीत काळ आला खरा.

**कृष्णशास्त्री**—आला ह्मणजे! संशय कीं काय? हें पूर्व भविष्य जाणूनच तर शास्त्री व भिक्षुक मंडळी जमवून "**सनातन धर्मप्रसारक ब्रह्मसभा**" स्थापन केली.

**बचंभट**—अशा संधींत ही सभा स्थापन झाली ह्मणून ठीक झालें. नाहीं तर मोठीच—

**कृष्णशास्त्री**—( आवेशानें ) मोठीच ह्मणजे—धर्मनाश व्हायला उशीर लागला असता कीं काय? बचंभटजी, हा **कृष्णशास्त्री** नसता तर—

**बचंभट**—पुरेच हाल झाले असते. सभाही स्थापन होतीना आणि आह्मां ब्राह्मणांना कुठें थाराही मिळताना. या भर कलियुगांत आपणांसारखीं विद्वद्रत्नें आहेत ह्मणूनच अंमळ ह्या लोकांना भीति आहे! धन्य आहे शास्त्रीबोवा आपली!

**कृष्णशास्त्री**– (मोठ्या आवेशानें) बचंभटजी, हें पहा, आत्मस्तुति करणें चांगलें नाहीं. पण ओघास आलें ह्मणून बोलतों. मी तर अशी भीष्मप्रतिज्ञा केली आहे कीं, पाहिजेल तें होवो, पण **देहं वा पातयेत् अर्थं वा साधयेत्** ह्या भगवदुक्तीप्रमाणें वर्णसंकरापर्यंत जरी गोष्ट येऊन ठेपली, तरी न डगमगतां स्वधर्माभिमान धरून स्वमत स्थापन केल्यावांचून कधींही राहणार नाहीं. येवढेंच नव्हे तर, जे कोणी माझे अनुयायी आहेत व पुढें होतील, त्यांचाही मनोग्रह माझ्याप्रमाणेंच करवीन तरच माझें नांव कृष्णशास्त्री. नाहीं तर धर्माचें मातेरें झाल्यावांचून राहावयाचें नाहीं. (उन्हाकडे पाहून) चार वाजण्याचा सुमार झाला. मला अजून बरेंच लांब जायचें आहे– दिव्यांकडे गरुडपुराण ऐकण्याकरतां. मंडळी माझी वाट पहात बसली असेल.

**बचंभट**–हो! बरी आठवण झाली. उद्यां आप्पासाहेब दिव्यांचा अकरावा दिवस असेल, तेव्हां रामभट गाडगिळाला बराच लाट मारायला साधेल. अगोदर त्यांचें

घराणें पडलें जबरदस्त श्रीमंत, तशांत उत्तरकार्यही कांहीं दुसऱ्या तिसऱ्याचें नाहीं, खुद्द यजमानाचेंच, मग पैशाला काय कमी! (आनंदानें) तरी तो परवां ह्मणत होता कीं, हें आप्पासाहेबाचें चवथें कुटुंब! तेव्हां अल्पवयीच असेल ह्मणून (तर्जनीवर तर्जनी घांसून) अशाबद्दल इकडचे तिकडचे शास्त्रार्थ दाखवून तेंही (वपन) ठेवविलें आहे. पुढें ह्मणजे वर्षाचे आंत घालतों तोंही घाट कीं, झालीच शेंकड्याची आणि माझी गांठ! खरेंच सांगतों शास्त्रीबोवा, यजमान मात्र चांगले पाहिजेत कीं, ह्या भिक्षुकीच्या धंद्यासारखा धंदा नाहीं. आडवा हात मारून पडले आहेत राजासारखे!

**कृष्णशास्त्री**—तें सगळें खरें. पण तसे दिवस हल्लीं राहिले नाहींत. फार लांब कशाला? तुमचे यजमान बापूसाहेब नातवंडे ह्यांचेंच उदाहरण घ्याना!

**बचंभट**—ते कसले घेऊन बसलां अहांत यजमान! यजमान पण यजमान. यजमानापेक्षां त्यांचे चिरंजीव तर सवाईच! पण करणार काय? अहो कसलें काय आणि कसलें काय? उगीच करायचें ह्मणून करतात झालें एखादें धर्मकृत्य! त्यांत धर्मपरायणबुद्धि थोडकीच असते!! बायकोच्या आग्रहास्तव करायचें. तशांत यजमानीण आहे आमच्या गांवची आणि त्यांत आमच्या कुटुंबावर आहे अंमळ तिचा लोभ, ह्मणूनच कायतो दोन पैशांची आशा आणि ह्मणूनच कांहीं लभ्यांश!! येवढेंच कायतें! बाकी

अशांचें दर्शन सुद्धां घेऊं नये. पण करावें काय? असावी तर रामभट्टासारखी भिक्षुकी असावी.

**कृष्णशास्त्री**– (आठवलेसें करून) हो बरी आठवण झाली. काय हो बचंभट, बापूसाहेब नातवंड्यांच्या मुलीचें लग्न असेल यंदां!

**बचंभट**–(तिरस्कारानें) कसलें लग्न घेऊन बसलां अहांत! कन्या, कन्या कसली! लग्न नाहीं झालें ह्मणून ह्मणायची मात्र कन्या; एरव्हीं दोन मुलांची आई शोभेल! अशा अविवाहितेला डोळ्यांनीं पाहूं सुद्धां नये. असतना परतीं आपणांस त्यांशीं काय करायचें आहे; याबद्दल शास्त्रांत केवढीं प्रायश्चित्तें असतील. लग्नांत दोन पैसे अधिक कसे काढावे एवढेंच कायतें आपलें काम!

**कृष्णशास्त्री**–काय! ती एवढी आहे? एकूण धर्मबाह्य आचरण खरेंच! ह्मटलें आहे:– ' **अष्टवर्षा भवेद्गौरी ॥ नव वर्षा तु रोहिणी ॥ दशवर्षा भवेत्कन्या ॥ अत ऊर्ध्वं रजस्वला ॥** *

**बचंभट**–हा तर शास्त्रार्थ झाला. पण आमच्या प्रयोग कारांनीं देखील ह्मटलें आहे:– **अष्टवर्षा त्वियं कन्या ॥** वगैरे.

**कृष्णशास्त्री**–कसला विवाह न् कसलें काय? "मनःपूतं समाचरेत्" असा बेट्यांचा खटला.

(असें ह्मणून जातात.)

---

* यमस्मृति, पराशरस्मृति, संवर्तस्मृति.

# अंक पहिला.

## प्रवेश २ रा.

**स्थळ**—मुंबई-कृष्णशास्त्र्यांचें घर.

**पात्रें**-विनायकराव ( कृष्णशास्त्र्यांचा भाचा. )

**विनायकराव**– ( प्रवेश करतात. ) हर! हर! काय ह्या आमच्या मामांचा विलक्षण स्वभाव तरी? मी "आर्य-महिलोन्नतिदिग्दर्शन" मासिक पुस्तकाचा अंक वाचीत बसलों होतों तें कुठें त्यानीं पाहिलें मात्र! तों लागलेंच घेतलें मजजवळून मागून, आणि पाहिलें न पाहिलें इतक्यांत ह्मणाले "खबरदार असलीं धर्मोच्छेदक पुस्तकें पुनः माझ्या घरांत आणलींस तर." खरोखर मला ह्यांच्या ह्या स्वभावाचा मोठा चमत्कार वाटतो. त्यांच्या आणि माझ्या विचारांत जमीन अस्मानाचें अंतर. हेंच पहाना! मागें गणेशशास्त्र्याची मुलगी मला सांगून आली न आली तोंच उडाली आमच्या मामांची टिप्पणें पाहण्याची धांदल. ग्रहही अनुकूल आले! मग काय विचारतां? लागलीच टोंचणी माझ्या मागें. मी जेव्हां कांहींच उत्तर दिलें नाहीं, तेव्हां जे कांहीं मजवर संतापले तें कांहीं पुसूंच नका. पुढें मामीनें जेव्हां थोडीशी समजूत घातली तेव्हां कुठें गडबड जरा शांत झाली. ठीक झालें. मजकडून चकार शब्द निघाला नाहीं ह्मणून; नाहीं तर, कदाचित् त्यांचा उपमर्दही झाला असता. पहिल्यापासून माझ्या मनाचा ग्रह असा झाला

आहे कीं, लग्न करावयाचें तें योग्य वयांत आलेल्या सुशिक्षित अशा मुली बरोबरच करावयाचें. कारण सुशिक्षित स्त्रियेपासून पुरुषाला जें सुख मिळतें व तिला आपल्या नवऱ्याच्या हिताची जी काळजी असते, ती अशिक्षित स्त्रियेला कोठून असणार! पण नाहीं, आमचें तें खरें. हा त्यांचा न्याय. जेव्हां मी चाळीशीच्या घरांत जाणार, तेव्हां कुठें आमचा संसार सुरू होणार! अशा त्या अज्ञान मुली बरोबर विवाह करणें ह्मणजे किती अयोग्य? आजपर्यंत अभ्यासाच्या वगैरे अडचणीमुळें कसें तरी निभलें गेलें. पण आतां मात्र त्यांच्यापुढें कांहीं लटपट चालावयाची नाहीं. प्रत्यक्ष स्वतःच्या मुलीचें लग्न त्यांनीं सातवे वर्षीं केलें! पण नवरा मिळाला तो पंडुरोगी! लहानपणीं मुलांची वाढ कळणें कठीणं. तशींच तीं पुढें रोगी किंवा निरोगी निपजतील ह्याचा अंदाज करणें सुद्धां अशक्य. पण, त्यांना ह्या गोष्टी सांगाव्या कोणी! बरें तें असो. आजपर्यंत त्यांनीं माझें संगोपन केलें आहे आणि हल्लीं माझे ममतेचे वडील असे तेच आहेत. तेव्हां त्यांचा उपमर्दही करणें योग्य नाहीं. तरी काहीं चिंता नाहीं. संधी बरी आहे. परवां पाठशाळेंत गुरूची जागा मिळाल्यामुळें पुण्यास जाण्याचा हुकूम आला हेंही ठीक झालें. हे सर्व त्रास साहजिकच चुकले. ( घड्याळाकडे पाहून ) समाजांत जाण्याला बराच उशीर झाला. आतां येथें राहून उपयोग नाहीं.

[ असें ह्मणून जातो. ]

---

# अंक पहिला.



## प्रवेश ३ रा.

**स्थळ**—मुंबईतील रस्ता.

**पात्रें**-गणेशशास्त्री, पिलंभट व चक्रंभट लटपटे.

( उभे असतां पडदा उघडतो. )

**पिलंभट**—[ तपकीर ओढून व गणेशशास्त्र्यापुढें डबी करून ] काय ह्मणे हजाराचा तोडा असला तर हो ह्मणा! नाहीं तर स्वस्थ बसा आपले.

**गणेशशास्त्री**—काय, हजार रुपयांखालीं बचंभट आपली मुलगी देत नाहीं काय? मांडलें आहे तरी काय त्यानें?

**पिलंभट**—काय करावें शास्त्रीबोवा? बायको मेली नसती तर ठीक झालें असतें. त्यानें जर नच ऐकलें तर दिले पाहिजेत हजार रुपये!

**गणेशशास्त्री**—पण पिलंभटजी, आहेत का नवळ हजार रुपये? का आपलें हँच!

**पिलंभट**—छे: हो, आहेत पांचशेंएक! काय सांगू शास्त्रीबोवा! आज मजजवळ नाहीं ह्यणायला हजार रुपये रोख असते. परंतु कर्मगतीपुढें इलाज नाहीं. आमची थोरली मुलगी गंगू, तिचे अकराशें रुपये घेतले आणि दक्षिणेदुक्षिणेचे मिळून झाले होते पंधराशें, ह्मटलें असावेत जवळ! मुलीचें लग्न होऊन पुरे सहा महिने झाले नाहींत

तोंच जांवईबुवांनीं गवाळें आटोपलेंच. पुढें मुलगी वयांत आली. तिचीही तारुण्यानुरूप झालेली व्यवस्था केली! अशा दुःखांत तिचा आजार जास्त वाढून ती परलोकवासी झाली. अशा अनेक विवंचनेंत पैशापरी पैसा गेला, व मीही उघडा पडलों. सारांश, ग्रहदशा मोठी कठीण आहे. आतां, जांवई माझेहून थोडा जास्त उमरीचा होता. परंतु द्रव्यलोभानें टिप्पणें पहावयाचीं तें विसरलों. असो नशीब आमचें!

**गणेशशास्त्री**—आतां तरी बचंभटाच्या मुलीशीं तुमचे ग्रह जुळून येतात का? तुह्मीं स्वतः ज्योतिषी अहांत.

**पिलंभट**—फारच उत्तम! ह्मणूनच तर झालों आहें तयार द्यायला एक हजार! आणि एवढ्याच करतां तर आमच्या मधल्या मुलीचें सातशें रुपयांला जमविलें. नाहीं तर एवढ्या थोड्या शा रकमेला द्यायचीच नव्हती. बायको वांचून संसारयात्रा व्यर्थ आहे. आणि मी कांहीं आजच ह्मणण्यासारखा ह्मातारा झालों नाहीं. नुकतेंच गेल्या महिन्यांत एकुणसाठावें वर्ष सरून साठावें लागलें आहे. तशांत घरांत सर्व गोष्टींची पंचाईत. असो. आहे तिसरी मुलगी. तिला ईश्वरानें हयात ठेवावी ह्मणजे येतील हजार बाराशें!
(इतक्यांत चक्रंभट हातांत वर्तमानपत्र घेऊन लगबगीनें प्रवेश करतात.)

**चक्रंभट**—(आपल्याशींच) काय बेट्यांनीं बंड माजविलें आहे? नाहीं नाहीं ह्मणतां, कुणी दाक्तर, कुणी वकील,

बारिस्टर, जज्ज, मुनसफ, मामलेदार, बडे लोक असे एक का-दोन, शेंकडो लोक जमले होते. मग काय विचारतां, समाजांत धर्माविरुद्ध भाषणांवर भाषणें आणि टाळ्यांवर टाळ्या एकसारख्या चालल्या होत्या. ठीकच आहे, सत्कर्मास पुढें होण्याची वेळ आली कीं, गुलामांना झालेंच बाप मेल्याचें दुःख! वाईट तेवढें चांगलें. धर्मबाह्य संस्थांकरतां किती तरी पैसा जमविला आहे! याला ह्मणावें तरी काय? पैसा ह्मणजे हाताचा मळ वाटतो. कां नाहीं वाटणार? धर्मबाह्य चालणारे तेवढे आमच्या सरकारास पसंत. ह्मटलें आहे, "यथा राजा तथा प्रजा." तेव्हां त्यांना पगाराचा कुठून तोटा असणार! नाहीं तर आह्मां भिक्षुकांस दिडकीच्या भाजीचीही महर्गता! हो, लांब कशाला, माझ्या स्वतःच्या अग्निहोत्रासाठीं दक्षिणेची यादी केली होती, तेव्हां मारून कुटून कुठें सहा महिन्यांनी सगळे पंधरा रुपये जमले! एवढ्या रकमेंत आह्मीं खावें काय? आणि अग्निहोत्र चालवावें तरी कसें? सारांश ह्या सुधारकांनीं बंड माजविलें आहे. कलियुगामुळें झाली आहे पापाचरणाची बुद्धि! पण खूप समजा कीं, "सत्यमेव जयते." अंतीं सत्यधर्माचाच जय होणार! असो, चिंता नाहीं.

**गणेशशास्त्री**—(जरा लांब बघितलेंसें करून) काय पिलंभट, ते कोण चक्रंभट काय हो?

**पिलंभट**—होय शास्त्रीबोवा! तीच स्वारी.

**गणेशशास्त्री**—मोठ्या लगबगीनें इकडेसच येत आहे असें वाटतें.

**पिलंभट**—होय, इकडेसच येत आहेत. शास्त्रीबोवा? हे चक्रंभट्ट आपल्या सभेचे चिटणीस बरें ?

**गणेशशास्त्री**—खरंच सभेला चिटणीस असावा तर असाच असावा. जात्या भिक्षुक असून चिटणीसीचें काम उत्तम करतो. पण पिलंभटजी, चक्रंभट मोठे कडकडीत ब्राह्मण आहेत हो!

**पिलंभट**—यांत काय संशय! खराच कर्मठ ब्राह्मण! अगदीं योग्य. (चक्रंभट जवळ आलेसें पाहून)

**गणेशशास्त्री व पिलंभट**—(पुढें होऊन) नमस्कार चक्रंभटजी, नमस्कार, कां येवढी लगबगशी? निघालांत तरी कुठें?

**चक्रंभट**—नमस्कार, नमस्कार, ठीक झालें. अनायासें आपण भेटलांत.

**गणेशशास्त्री**—कां, कांहीं नवल विशेष आहे वाटतें?

**चक्रंभट**—(रागानें) अहो कसलें नवल विशेष घेऊन बसलां अहांत! आपली सभा रसातळाचा मार्ग धरणार. मग बसा स्वस्थ वर्णसंकर, वर्णसंकर, वर्णसंकर करीत. तरी ह्मणत होतों कीं, लौकर श्रीपर्यंत जावें आणि टाकावे त्यांचे हातपाय बांधून, पण आमचें ऐकतें आहे कोण! सगळ्यांना स्वधर्माचा कंटाळा येत चालला आहे. ब्राह्मणांचें राज्य गेलें तें कां उगीच गेलें!

**गणेशशास्त्री**–हो! पण त्या सुधारकांनीं केलें तरी काय एवढें?

**चक्रंभट**–काय ह्मणजे? गुलामांनीं स्वधर्माचें मातेरें करण्याची वेळ आणली आहे. आणि दुसरें काय?

**गणेशशास्त्री**–ती कशी!

**चक्रंभट**–गेलों होतों सकाळीं एका यजमानाकडेस, तों त्याजकडील हल्लींचीं इंग्रजी शिकलेलीं द्वाड पोरटीं, बसलीं होतीं वर्तमानपत्रें वाचीत! मला पाहतांच "भटजी! वाचा हें वर्तमानपत्र" असें ह्मणून मज पुढें टाकलें. न् ह्मणे "तुह्मी ह्मणत होतांतना कीं, काय चालणार आहे त्यांचें? पण पहा दिवसें दिवस कसा झेंडा लागत चालला आहे तो!" या प्रमाणें लागलीं अद्वातद्वा बरळावयाला. हें ऐकतांच माझ्या आंगाची काय आग झाली आहे ह्मणतां, मीं तेथून निघालोंच नुसत्या पागोट्या धोतरांनींच, सभेच्या अध्यक्षांकडेस जायला. तों आपणही भेटलांत, हेंही उत्तम झालें. आपण सभेचे उपाध्यक्षच अहांत. चला तर आतां आमच्या बरोबर अध्यक्षांकडेस!

**गणेशशास्त्री**– (वर्तमानपत्र वाचून) एकूण समाजाचा वार्षिकोत्सव झाला अँ? काय बेट्यांनीं धर्मबाह्य संस्था स्थापन केल्या आहेत तरी! आणि त्याकरतां दुसरा पैसाही जमविला आहे. एकंदरींत दीर्घोद्योगी खरे. चक्रंभटजी, ह्यांनीं अशा किती जरी उड्या मारल्या तरी तितक्याच. कारण, जोंपर्यंत क्षेत्रस्थादि ब्राह्मणांसह

आह्मीं श्रीपर्यंत गेलों नाहींत तोंपर्यंतच्या ह्या सगळ्या गोष्टी! काशी आदिकरून क्षेत्रस्थ ब्राह्मण कमी नका समजूं!

**चक्रंभट**–चला तर उगीच उशीर नको. ( पिलंभटास ) कां पिलंभटजी! यायचेंच ना आमच्या बरोबर?

**गणेशशास्त्री**–राहूंद्या त्यांस, सध्यां स्वारी आहे बायकोच्या शोधांत. ते न आले ह्मणून आपलें कांहीं अडणार आहे असें नाहीं.

**चक्रंभट**–( रागानें ) अडतें आहे कुणाचें? धर्मसंस्था सुरक्षित राहिली, तर भिक्षुकी आह्मीं एकटेच नाहीं करणार! त्यांतून लागलाच असेल ह्मातारपणीं बायकोचा छंद, तर ( तर्जनीवर तर्जनी घांसून ) अशी झालेली ह्या ठेऊन घरांत!

**पिलंभट**–इतकें रागावयाला नको आहे, चक्रंभटजी! शास्त्रीबोवा काय, करताहेत थट्टा आमची! झालें!

( असें ह्मणून जातात. )

---

# अंक पहिला.



## प्रवेश ४ था.

**स्थळ**–बापुसाहेब नातवंड्यांचा बंगला.

**पात्रें**–बापुसाहेब नातवंडे वकील, काशीबाई–त्यांची बायको, दामूअण्णा–त्यांचा मुलगा, सुशीला–बापुसाहेबांची मुलगी, व गोपाळराव–काशीबाईचा भाऊ, [ बसले असतां पडदा उघडतो. ]

**बापुसाहेब**–कालचा समारंभ मोठा मजेचा झाला. त्यांत

विनायकरावांनीं तर फारच मजा केली. त्यांनीं ज्या ज्या ह्मणून सूचना केल्या, त्या त्या सर्वांस पसंत पडल्या. वः एकूण मुलगा अल्पवयी असून हुशार खरा. पण, कायहो गोपाळराव! ते कोण व कुठले ह्या बद्दलची तुह्मांला कांहीं माहिती आहे का?

**गोपाळराव**—होय. ते नगरचे राहणारे असून तेथील एका नामांकित घराण्यांतील आहेत. ते आणि मी एकाच पाठशाळेंतून बी. एची. परीक्षा उतरलों. हल्लीं त्यांची नेमणूक पुण्यास झाली आहे. एकंदरींत स्वभावानें काय, आणि इतर बाबतींत काय, ते फारच सालस मनुष्य आहेत. अजून त्यांचें लग्न झालें नसून सद्यस्थितिला अनुसरूनच लग्न करण्याचा त्यांचा मनोदय आहे. कृष्णशास्त्री हे त्यांचे मामा, त्यांजकडेसच राहून त्यानीं विद्याभ्यास केला.

**बापुसाहेब**—काय ह्मणतां? शास्त्र्यांच्या घरीं राहून अशी मनोवृत्ति राहणें ह्मणजे फारच कठीण! पण हें पहा गोपाळरावजी! खऱ्या सुशिक्षणाचा परिणाम असाच हितकारक व्हावयाचा. ज्ञान ही एक मोठी अजब चीज आहे. ज्ञानी मनुष्यास कशीही संगति मिळो, तो तिजपासून आपला फायदाच करून घेणार! एकंदरींत त्यांच्या सुंदरपणाला शोभविणारी जी विद्या—विनय—संपन्नता, ती पाहून मला फारच आनंद होत आहे.

**काशीबाई**—खरंच का! (गोपाळरावास) तुला ठाऊक असूनही मला इतके दिवस कांहींच कळूं दिलें नाहींस हें

कसें ? ( बापुसाहेबांस ) जमत असल्यास पहाना तजवीज करून.

**गोपाळराव**—जमण्याला ह्मणजे कांहीं अडचण आहे असें नाहीं. शास्त्राप्रमाणें गोत्रप्रवरादि सर्व कांहीं यथास्थित जुळत आहे. ही गोष्ट तुमच्याजवळ मी कधींच काढली असती. पण दामूअण्णाचा व त्यांचा स्नेह आहे. तेव्हां ह्मटलें कळलेंच असेल! ( इतकें बोलणें होत आहे तोंच दामूअण्णा येतात त्यांजकडे पाहून. ) हा पहा !

**दामूअण्णा**—कसली गोष्ट, विनायकरावांविषयीं का? तें तर माझे मनांत आज पुष्कळ दिवस घोळत आहे. पण ह्मटलें असतील बाबांस माहीत ? नाहीं तर एव्हांना केव्हांच जमलें असतें. ते तर आपलेकडे नेहमीं येत असतात. इतकेंच नव्हे तर कांहीं कारणावरून सुशीला मला ह्मणाली कीं, विनायकरावांचा विद्याव्यासंग व शांतस्वभाव मला फार आवडतो ह्मणून? (इतक्यांत सुशीला येते व बापुसाहेब सुशिलेस विचारण्याबद्दल गोपाळरावांस खूण करितात.)

**सुशीला**—अग बाई ? आज मामांना बनलें तरी कसें इकडे यायला ? आतांशा आमची आठवण सुद्धां होत नाहीं.

**गोपाळराव**—तूं कुठें येतेस आमच्याकडे ? जशास तसें झालें पाहिजे. पण मघांपासून तूं होतीस कुठें ? केव्हांचा मी तुझी वाट पहात बसलों आहें. हो ? बरी आठवण झाली. आपल्या अण्णाचे मित्र ते विनायकराव, त्यानां तूं ओळखतेस का ?

**सुशीला**–( स्वतःशींच ) हा कां बरें ह्यांनी मला प्रश्न विचारला ? ( विचार केलेंसें करून) आतां उत्तर बरीक मोठ्या सफाईनें दिलें पाहिजे [ उघड ] आज मलासें विचारतां ? तुह्मी जसे नवखेच आलां अहांत या मुंबईत.

**गोपाळराव**–अहाहा, काय पण उडवा उडवी करते आहे ? बरें पण मला पाणी तरी देशील आणून प्यायला ? ( सुशीला जाऊन पाणी आणते इतक्यांत )

**बापुसाहेब**–सुशीलेच्या मनालाही पसंत आहेसें वाटतें. तेव्हां उगीच लांबणीवर टाकण्यापेक्षां, लग्नाचें जुळवावें हेंच उत्तम. योग मोठा उत्तम आला आहे. विचाराच त्यांना गोपाळरावजी तुह्मीं.

**काशीबाई**–विसरशील हो. नाहीं तर "हातचें घालवून पळत्याच्या पाठीस लागण्या" सारखें करशील. ( सुशीला येते. )

**गोपाळराव**–( पाणी पिऊन ) छेः इतकें देखील का मला समजत नाहीं.

**बापुसाहेब**–( घड्याळाकडे पाहून ) अरे इतक्यांत साडेचार झाले. मला अजून कोटांत जायचें आहे. ( गोपाळरावांस ) कां यायचें आहे का आमच्या बरोबर ? येतांना चौपाटीवरून हवा घेत येऊं

**गोपाळराव**–चलावं मलाही तिकडेस अंमळ काम आहे. ( दामूअण्णास ) चला अंमळ फिरून येऊं.

**दामूअण्णा**–चला मलाही कलाकौशल्याचें प्रदर्शन पाहवयास जायचें आहे. ( जातात. )

**काशीबाई**–[ उठून जातांना ] सुशीले तूं रहा येथें मी जरा जाऊन येतें.

**सुशीला**–[ आपल्याशींच ] मघां मामांनीं विचारलें, यावरून त्या योग्य पुरुषाविषयीं माझा आशावृक्ष बराच बळावत चालला आहे. माझ्या आईनें व बाबांनीं मला योग्य विद्या शिकवून खऱ्या सुशिक्षेचा धडा घालून दिला; त्याप्रमाणें एखाद्या योग्य पुरुषाशीं माझा विवाह केला कीं, माझ्या सारखी खरी सुखी स्त्री आमच्या स्त्रीवर्गांत क्वचितच आढळेल. ( विचार केल्यासारखें करून. ) हो, पण, उगाच संशय तरी कशाला हवा ? प्रत्यक्ष बाबांच्या समोर मामा ह्मणजे माझी थट्टा करतील असें कधींही व्हावयाचें नाहीं. माझें मन पाहण्यासाठींच मामांजवळून बाबांनीं विचारविलें नसेल, असें तरी कशावरून ? माझे बाबा व आई जें कांहीं करतील तें विचारानेंच करतील. त्यांनीं मला विद्या शिकवून खऱ्या सुशिक्षेचा जो धडा घालून दिला, तो कांहीं उगीच नाहीं. तेव्हां त्यांच्या हातून जें कांहीं व्हावयाचें तें सर्व कांहीं नीट होईल. पण मेला माझा जीव कसला वेडा ? नाहीं नाहीं ते विचार मनांत येतात. हे असले विचार करीत बसण्यापेक्षां कांहीं तरी उद्योगांत वेळ घालवावा हें बरें. हो पण, बरी आठवण झाली. काल आईनें चंद्रकळेवर कशीदा काढावयास सांगितलें होतें तो काढीत बसावें ह्मणजे वेळ तरी निघून जाईल.

[ जाते. ]

# अंक पहिला.

## प्रवेश ५ वा.

**स्थळ—मुंबई**-कृष्णशास्त्र्याचें घर.

**पात्रें**—कृष्णशास्त्री, गणेशशास्त्री बागुर्डे, चक्रंभट्ट, पिलंभट गोमुखे ( बसले असतां पडदा उघडतो. )

**चक्रंभट**–( आवेशानें ) ह्मणूनच मी आज इतके दिवस ह्मणत होतों कीं, चला **श्री**पर्यंत. परंतु सगळेच आपले थंडेथंड. शास्त्रीमंडळापुढें आह्मीं भिक्षुक ह्मणजे अगदीं मूर्ख, ज्ञानशून्य, हवें तसें बरळणारे, तेव्हां आमचें ऐकतें कोण ? कांहीं करावयाचें असेल तर भरा सभा नाहीं तर बसा विठ्ठल विठ्ठल ह्मणत !

**कृष्णशास्त्री**–[मोठ्या आवेशानें] चक्रंभटजी, तुह्मीं मला त्या धर्मभ्रष्ट सुधारकांस पाठबळ देणारा समजतां काय ? मी किती बाणेदार आहें, हें अजून तुह्मी जाणत नाहीं ह्मणून तुमच्या ह्या सगळ्या गोष्टी. पण खूब समजा कीं, सभा स्थापन करण्याच्याकामीं, मी जिवापाड परिश्रम करतों, तसाच स्वधर्म रक्षणाप्रीत्यर्थ माझा प्राणसुद्धां खर्ची घालण्यास मी तयार आहें. पण, ह्मटलें, शनैःशनैः होईल तें चांगलें. आतां मात्र कंबर बांधण्याची वेळ आली खरी.

**गणेशशास्त्री**–अगोदर ठाकुरद्वारीं, एक लहानशी सभा भरवूं, तेथें सुधारकांनीं केलेले नियम वगैरे वाचून दाखवूं,

मग सर्वानुमतें क्षेत्रस्थ ब्रह्मवृंद व गुर्जरांचे गुरु, ह्यांस सामील करून घेऊन मग जंगी जाहीरसभा द्यावी ठोकून; ह्मणजे श्रीकडे जायला मार्गही उत्तम होईल.

**पिलंभट**—(आनंदानें टाळी पिटून) गणेशशास्त्र्यांच्या युक्तीप्रमाणें जंगी सभा झाली कीं, मोडलेच त्यांचे हात पाय! हजारों विद्वान् ब्राह्मण जमल्यावर, त्यांचे शास्त्रार्थ ऐकूनच हीं सुधारकें जातील भेदरून; मग श्रीकडेस जायची गरज सुद्धां पडणार नाहीं.

**कृष्णशास्त्री**—जशी त्यांनी व्याख्यानांची वगैरे व्यवस्था केली आहे, तशी आपल्याकडेही करून जीं जीं त्यांचीं धर्मविरूद्ध व्याख्यानें होतील, त्यांच्या खंडनार्थ आपल्याकडेही प्रति व्याख्यानें देऊन त्यांचे योजलेले विचार जागच्या जागीं राहतील असेंच केलें पाहिजे; तेव्हांच ते ताळ्यावर येतील.

**गणेशशास्त्री**—अगदीं योग्य, [ चक्रंभटास ] कां चक्रंभटजी ? झालेंना आतां तुमच्या मनाजोगें ?

**चक्रंभट**—ह्यांत आमच्या मनाजोगें तें काय व्हायचें? हें सर्वांचेंच काम आहे. [ कृष्णशास्त्र्यांस ] सत्य सांगतों शास्त्रीबोवा, आपल्या खेरीज ह्या सभेंत मला एकही मनुष्य बाणेदार दिसत नाहीं. आपल्याच योगानें झाल्यास कांहीं चीज होईल. त्यांस एवढें देखील समजूं नये कीं, सुधारणा वृद्धिंगत झाली कीं, आह्मां भिक्षुकांस कुत्रा देखील विचारणार नाहीं !

**कृष्णशास्त्री**–अहो तुह्मीं असे भितां कां चक्रंभटजी? जावत्कालपर्यंत माझ्या जिवांत जीव ह्मणून आहे, तावत्कालपर्यंत हा-हा-कृष्णशास्त्री कोणाचेंही यत्किंचित् चालूं देणार नाहीं. समजलांत [ पडदा पडतो. ]

**अंक पहिला समाप्त.**

---





# अंक दुसरा.

## प्रवेश १ ला.

**स्थळ**—पिलंभट गोमुख्यांचें घर.

**पात्रें**—पिलंभट गोमुखे व मोरभट पुराणिक दलाल.

**मोरभट**–[मिशांस पीळ देत बसले असतां] मी नांवाचा मोरभट पुराणिक आहें समजलांत. चला तर खरे मजबरोबर कीं, जमवितोंच एका हजाराचे आंत. मग पहाल कशी मौज होते ती! बचंभट माझें ऐकणार नाहीं ह्मणतां! पण माझा एक शेंकडा पाहिजे तयार. शेंकड्याची थैली एका हातांत, व दुसऱ्या हातांत साखर, असें झालें पाहिजे. नाहीं तर कांहीं जुळणार नाहीं बुवा बरोबर.

**पिलंभट**–आठशांपर्यंत तरी जमवा. ह्मणजे तुमचा एक शेंकडा लागलाच मजकडेस. अगोदर तुह्मांला देईन आणि मग त्याला. आतां तर झालेंना मोरभटजी?

**मोरभट**–(आनंदानें मान डोलवून) मग काय? जमलेंच ह्मणून समजा. आलीच तुमच्या घरांत बचंभटजीची पोर. बांधा सुमुहूर्तीं नेऊन मंगळसूत्र तिच्या गळयांत कीं, झालेंच लग्न. बाकीचे सर्व सोहाळे पैशाचे आहेत!

**पिलंभट**–खरेंच. हीं सगळीं आह्मां ब्राह्मणांचीं ढोंगें

आहेत. आह्मींच जर हीं न केलीं, तर ब्राह्मणेतर लोक मुळींच करणार नाहींत. मग आमचें पोट भरणार तरी कसें? ह्मणून आमच्या पुर्वींच्या ब्राह्मणांनीं आपल्या उदर निर्वाहाच्या सोयी करतां दीर्घदृष्टीनें ह्या रीतीभाती करून ठेविल्या आहेत. काय ह्मणे-- "गुळाचा गणपती आणि गुळाचा नैवेद्य," पण हल्लींच्या काळांत असलीं ढोंगें चालणें अंमळ कठीणच.

**मोरभट**–[ तिरस्कारानें ] राहूंद्या हो ह्या गोष्टी. कसले काळ घेऊन बसलां अहांत. पुढें काय जळतें आहे याचा विचार करा आधीं. अशानें पुराणाला जायला मात्र वेळ होणार.

**पिलंभट**–( उठून ) हो पण पागोटें घालूं का तेंही नको?

**मोरभट**–पाहिजे तर. श्वशुरगृहीं अशा भट्टी पोशाकानें का जायचें? सासुबाई खुष झाल्या पाहिजेत. ह्मणून तर ह्मटलें. ( पिलंभट आंत जातोसें पाहून) नवरा मरो कीं नवरी मरो. आपले तर दोन्हीकडून दोन शेंकडे तयार झालेच. पुढें लग्नांत पाहतच आहोंत. [ पिलंभट पोशाक करून येतो. ]

**पिलंभट**–झालें कीं नाहीं तुमच्या ह्मणण्या प्रमाणें तयार. ( खोंकून ) अलीकडे यालाही बराच ऊत आला आहे. ( खडीसाखर तोंडांत टाकून ) ही अंमळ कफ सुटण्यास बरी पडते. हो पण मोरभटजी, कपडे बिपडे घालून झाल्यावर जरा आरशांत पाहिलें तर मी ह्मणजे अगदीं

म्हातारा दिसतों आहें असें केवळ नाहीं. जरी अर्धेमुर्धे दांत पडले आहेत तरी साफच बोळकें झाले आहे असें नाहीं.

मोरभट–असें काय म्हणतां हो पिलंभटजी? तुम्हीच का म्हातारपणीं लग्न करायला निघालां अहांत. अशीं केवढीं उदाहरणें सांपडतील. हो. बरी आठवण झाली. (खूण करून) घेतले आहेत ना बरोबर? नाहीं तर धांदलींत विसरायचे. आणि तेथें गेल्यावर पडेल पंचाईत.

पिलंभट–(तिरस्कारानें) घेतले आहेत हो. भितां काय असे मोरभटजी तुम्ही. मला सांगायला का हवें आहे?

मोरभट–म्हटलें राहिलें कीं राहिलेंच! बरें पण चलायचें ना?

पिलंभट–हो हो! चला. मजकडून खोटी नाहीं.

(असें म्हणून निघून जातात.)

---

# अंक दुसरा

## प्रवेश २ रा.

स्थळ–मुंबई वचंभट्ट भुसकुट्यांचें घर.

पात्रें–वचंभट, त्यांची बायको पार्वतीबाई, सुगुणी, वचंभटाची मुलगी, पिलंभट, आणि मोरभट पुराणिक. (वचंभट व पार्वतीबाई बसलीं असतां पडदा उघडतो)

वचंभट–(तिरस्कारानें) अग ए, तूं असा हट्ट धरून कां बसतेस? तो म्हणजे फार म्हातारा झाला आहे असें

नाहीं. उष्णतेनें नाहींका एखाद्याचे दांत जाऊन केंस पिकत? तशांतून ते गणेशशास्त्री व मोरभट्ट ह्मणत होते कीं, तिच्या भ्रतारभुवनाचे ग्रह तर फारच उत्तम आहेत. हो लांब कशाला; तूं तुझेंच उदाहरण घेईनास? तूं माझी ह्या-ताऱ्याची तिसरी बायको. नाहीं का? असें असतां नाहीं का झालीं तुला दोन मुलें? तरी अजून आहेंना मी जिवंत! तशांत मी ह्मणजे कांहीं सशक्त आहें असेंही नाहीं. हें बघ चालत आलेली लक्ष्मी दवडण्याची बुद्धि धरूं नकोस.

**पार्वतीबाई**—( रागानें ) 'साठी नी बुद्धि नाठी,' तशांतली गत. जाणून बुजून आपल्या पोरीला विहिरींत ढकलून द्यायची बुद्धि सुचली आहे. दुसरें कांहीं नाहीं. ही गोष्ट बाहेर पडल्यापासून लोक कसे मला बोंचबोंचून खात आहेत. हें पाहयचें का नाहीं आधीं?

**बचंभट**—( रागानें ) लोकांशीं काय कर्तव्य आहे आपणाला? एवढी रक्कम चालून येत आहे, तिजकडे पाहशील कीं नाहीं. तिच्या नशीबींच जर दुःख भोगावयाचें असेल तर चुकणार का आहे? आपण करून काय होणार? ह्या विधीसूत्राच्या गोष्टी आहेत. पुरे आतां तें तुझें चऱ्हाट. ही आली आहे लक्ष्मी यायची वेळ. ह्मणून बस कशी अगदीं चुप्. रुपये आल्यावर मी कांहीं नाहीं घालणार गोट पाटल्या आंगावर. तूंच ते घालून मिरवशील.

**पार्वतीबाई**—तिच्या नशीबींच जर तसें लिहिलें असलें, तर आमची तरी कां बुद्धि फिरूं नये?

**बचंभट**–(जरा लांब बघितलेंसें करून) आतां मुकी बस कशी. ते बघ आले. पानसुपारीचें तबक तरी आणून ठेव इकडे. [पार्वतीबाई तबक आणून ठेवते.]

**पिलंभट**–निघतांना शकूनही चांगले झाले. यावरून कार्यसिद्धि उत्तम होईल असें वाटतें.

**मोरभट**–होय शकून ह्मणजे? जसे व्हायला पाहिजेत तसेच झाले. (बचंभटाकडे पाहून) हे पहा बचंभट उभे आहेत. (बचंभट, पिलंभट व मोरभट एकमेकांस नमस्कार करतात.) आलीच आहे आतां प्रीतीच्या नमस्काराची वेळ. बसावें बचंभटजी बसावें. उभे कां?

**बचंभट**–आपलेच योगानें आजचा सुदिन आला आहे.

**मोरभट**–कसला आमचे योगानें? तुह्मीं आपली मुलगी देणार व पिलंभट करणार. आह्मी आपले उगीच. असो. विनोद बराच झाला. होऊंद्या पुढचें काय करणें असेल तें. (बचंभटास खूण करून) ह्यांच्या मनांतून ह्मणाल तर नक्की पांचशांवर जायचें नाहीं. आणि दागिने त्यांच्या पहिल्या कुटुंबाचे आहेत तेवढचे. फार झालें तर शें दिडशांचे होतील.

**बचंभट**–छेः छेः हें नाहीं बोवा जुळायचें. माझे मनांतून फारच होतें; पण तुह्मी पडलांत मध्यस्ती, ह्मणून परवां घेतली एक शेंकड्याची झीज आणि तुमचा आग्रह फारच पडला, तेव्हां ह्मटलें असो. 'तूप कोठें गेलें तर खिचडींत' ह्या न्यायानें काल सोडला अर्धा शेंकडा.

आतां मात्र कवडीही कमती घेतां येत नाहीं. दागिन्याचें असो परतें. दागिने काय? 'शीर सलामत तर पगड्या पंचवीस.' त्यांना ईश्वरानें द्यावें आणि मग घालावे तिच्या आंगावर पुष्कळसे. आमचें पाहण्याचें काम. आह्मांल आनंदच होणार; पण, कमी केलेल्या रकमेचे आंत आणखी कमी करण्याची भीड नकाच घालूं आतां मोरभटजी तुह्मी.

**मोरभट**—बचंभटजी, तें सगळें खरें पण, त्यांना तरी पुढचा विचार आहे ना? का सगळेंच आपलें बायकोच्या भरीस घालायचें. पैसे भरून जी एवढी बायको करायाची ती संसाराकरतांच ना?

**बचंभट**—तुह्मी ह्मणतां तें सर्व खरें, पण पैसे घ्यायचे ते कशाकरतां? तशांत शिष्टाचार आहे, इतर लग्नखर्च आहे, मिळून हातीं तें काय राहणार! मुलें वाढवा, त्यांचें संगोपन करा, असे अनेक खर्च करून शेवटीं हातीं काहींच नाहीं. अहो, उष्टें खायचें तें तुपाच्याच आशेनें खायचें. यांतच काय तें समजा.

**मोरभट**—चला बोवा सहाशें घ्या. झालें आतां.

**बचंभट**—वारंवार कितीदां सांगावें! नाहीं बोवा नाहीं एवढ्यांत जमायचें.

**मोरभट**—( पिलंभटाचे कानांत ) काय बोवा तुमचा विचार? हे तर आपण बोललेल्या रकमेंत नाहींच कबूल होत, मग कसें?

**पिलंभट**–( कानांत ) करा तर आणखी पन्नास जास्त आणखी काय !

**मोरभट**–[ बचंभटास ] तुह्मी नाहींच ऐकत एकून. बरें तर आणखीं पन्नास वर घ्या. मग झालें !

**बचंभट**–साडेआंठशांला पै कमी होणार नाहीं.

**मोरभट**--बरें बोवा त्यांचें राहिलें, आमचें राहिलें, सातशांपर्यंत तरी आहे का मन ? होत असलें तर हे घ्या अर्धे रुपये मोजून, नाहीं तर हे उठलों.

**बचंभट**–[ रागावल्यासारखें करून ] मला कीं नाहीं मोरभटजी वारंवार बोलतां येत नाहीं. या उपर मर्जी तुमची.

**मोरभट**–[ पिलंभटाचे कानांत ] करूं साडे सातशें ! बोला कायतें ?

**पिलंभट**–[ तिरस्कारानें ] करा, तयार झालों खरे. हार जीत काय जी येईल ती सहन केलीच पाहिजे.

**मोरभट**–( बचंभटास ) तुह्मीं ऐकतच नाहीं तेव्हां काय करणार ? साडेसातशां पर्यंत तरी आहेका मर्जी !

**बचंभट**–[ रागानें ] मोरभटजी मला बोवा रंग कांहीं नीट दिसत नाहीं. मी राहीन माझ्या घरीं, ते राहतील त्यांच्या घरीं, व्हायचें असलें तर होऊन जाईल पण, आपल्या मित्रत्वांत मात्र वैमनस्य येईल.

**मोरभट**–हो ! हो ! पण असे रागावतां कां बचंभटजी तुह्मी. आह्माला काय दोघांकडेही बघायचें ( रागावल्यासारखें करून ) आपण ह्मणतच आहांत आणि आलें आहे

बहुतेक जुळत तेव्हां ह्मटलें उगीच कशाला! घ्यायचे असले तर घ्या आठशें रुपये नाहीं तर हे आह्मीं निघालोंच. कां आहे मर्जी. असल्यास पुतळी तयार आहे. बोला कायतें एकदांचें [ पिलंभटास ] असेंच कीं नाहीं पिलंभटजी!

**पिलंभट**–( मान हालवून ) होय तर काय! हें देखील बरेंच शक्तीबाहेर झालें ह्मणायचें. बरें असो.

**बचंभट**–( आपल्याशींच ) विशेष ओढून धरण्यांत कांहीं अर्थ नाहीं. बरें आठशें तर आठशें [ विचार केल्यासारखें करून ] त्यांतून एक शेंकडा तर गेला मोरभटाचा. बाकी राहिले सातशें, त्यांत लग्नाचा खर्च फार तर पांच पंचवीस रुपये होईल; तेही आहेत हल्लीं मजजवळ रोख सारांश सातशेंच्या सातशें राहतील अनामत. जर गणेशशास्त्र्याच्या मुलगीशीं जमलें तर मार्तंडाचेंही लग्न उरकून घेऊं ह्मणजे एका खर्चांत होऊन जाईल.

**मोरभट**–कां बचंभटजी विचारांतसे पडलांत. अजून नाहीं का मनाजोगतें झालें?

**बचंभट**–मनाजोगतें तें काय व्हायचें? मुलीचें लग्न करावयाचें तेव्हां सालंकृत कन्यादान करण्याचें नाहीं आपल्याला सामर्थ्य ह्मणून सोडले पन्नास रुपये. होतील तिच्या चोळी बांगडीला. उगीच त्यांचें तरी मन कशाला दुखवा. तसें नाहीं कन्यादान होत तर असें करूं. हेंच आपलें सालंकृत कन्यादान!

**मोरभट**–[ मान डोलवून ] ठीक. योग्य ह्मटलेंत. यालाच ह्मणतात समजूत. नाहींतर धरला आहे हट्ट. पण योग्य केलेंत बचंभटजी तुह्मीं. चला आणा मुलगी आणि करा काय जी रीत करणें असेल ती.

**बचंभट**–होय तें सगळें कांहीं तयार आहे. पण ह्मटलें निम्मेचा–[ इतकें बोलतो इतक्यांत ]

**मोरभट**–हो हो सर्व कांहीं तयारी आहे. चलावें तुह्मीं आंत.

**बचंभट**–( आनंदानें ) चलावें चलावें पिलंभटजी. आंत चलावें.

**मोरभट**–तुह्मी चला पिलंभटजी मी हा आलोंच. ( बचंभट आंत गेलासें पाहून पिलंभटास ) द्या कुठें आहेत ते, तो कांहीं ऐकणारा मनुष्य नव्हे. मघांच पाहिलेंत ना. आणि त्यांतूनही आपण आपलेकडून चोख असावें हें उत्तम.

**पिलंभट**–त्यांना द्यायचे ते हे चारशें आणि हे तुमचे शंभर झालें आतां. उगीच लांबणीवर तरी कशाला हवें!

**मोरभट**–हो मी तरी हेंच ह्मणतों. राहिलें कीं राहिलेंच मग. झालें देतों त्यांना हे. तुह्मी इकडेसच बसा ह्मणजे ठीक पडेल

**पिलंभट**–ठीक आहे. जा तुह्मी आंत.

**बचंभट**–( उठून ) या या असे या मोरभटजी. तुह्मी कांहीं परके आहां असें नाहीं.

**मोरभट**--(बसून) आह्मी कुठेंच परकेपणा मानीत नसतों. हें घ्या आपलें डबोलें. आमचे जवळ तरी कशाला पाहिजे. तुमचें तुह्माला लखलाभ होवो. आणि ईश्वर तुह्मांला असेंच देत जावो. (असें ह्मणून रुपये मोजून देतो.) हे घ्या तुमचे तिनशें आणि हा एक आमचा शेंकडा. काय सांगूं बचंभटजी, तुह्माकरतां किती समजावला आहे त्याला तें एक परमेश्वरालाच माहीत. तोंडानें सांगण्यांत ह्मणजे कांहीं विशेष अर्थ आहे असें नाहीं.

**बचंभट**–तुमचा परोपकारी स्वभाव पाहूनच मी तुह्मांस भीड घातली. पण मोरभटजी, तुमच्या रकमेंत नाहींच का कांहीं कमी व्हायचें? मी आपला कुटुंबवत्सल गरीब ब्राह्मण आहें ह्मणून ह्मणतों. कांहीं कराल तर पहा बोवा.

**मोरभट**–छे छे, तें कांहीं नाहीं. 'अति सर्वत्र वर्जयेत्' ईश्वरानें जें कांहीं दिलें आहे तेवढ्यांतच संतुष्ट असा ह्मणजे झालें. समजलांत. तें असो. आणा बघूं मुलगी कुठें आहे ती. ह्मणजे तुमचे जांवईबोवा तरी पाहतील आपल्या बायकोला. आणि मग वांटा साखर.

**बचंभट**–ठीक आहे. [बायकोस हांक मारतो.] अग ए, ऐकलेंस का? इकडे ये अंमळ कशी.

**पार्वतीबाई**–ऐकलें नी समजलें काय दिवे लावले ते. माझ्या पोरीच्या जन्माचें मातेरें करण्याचे तेवढे उद्योग केलेत. दुसरें कांहीं नाहीं.

**बचंभट**–(जवळ आलीशी पाहून) ही घे पुतळी आणि बांध सुगुणीच्या गळ्यांत, आणि द्रोणांत थोडीशी साखर घेऊन ये परती ( पार्वतीबाई रागानें पुटपुटत जाते व सुगुणी-सह साखर घेऊन येते ) [ सुगुणी मोरभटास नमस्कार करते. ]

**मोरभट**–( सुगुणीला पाहून ) वः मुलगी तर अगदीं योग्य आहे. पिलंभटजींस दाखवा अगोदर. [ पिलंभटास-दाखवून ] पिलंभटजी पहा हें तुमचें कुटुंब [ बचंभटाकडे वळून ] आणा बघूं साखर आतां कुठें आहेती. करूंद्या तोंड गोड. [ बचंभट साखर देतो ती तोंडांत टाकून ] पण जांवईबोवांस द्याल कीं नाहीं अगोदर. [बचंभट पिलंभटास देतो व पिलंभट स्वतःकडील त्यास देतो. ]

**बचंभट**–[ साखर तोंडांत टाकून ] हो पण मोरभटजी तिथीनिश्चयाचें कांहींच ठरलें नाहीं.

**मोरभट**–तें उद्यां कळवूं. चालू शुद्ध पक्षांतच धरा ह्मणजे झालें. मला इकडे बराच वेळ झाला. अजून पुराणाला जायचें आहे. [ पिलंभटास ] कां पिलंभटजी श्वशुर-गृहींचा नाहीं का लोभ सुटत.

**पिलंभट**–लोभ कसला वेळ येईल तेव्हां आहेच बसा-यचें. [ दोघेही बचंभटास नमस्कार करून जातात. ]

**मोरभट**–[ स्वतःशींच ] चला झालें एकदाचें. दोन्हीं कडचे मिळून दोन शेंकडे आपल्या पदरीं पडले. असो. [ आठवल्यासारखें करून ] काय लोभी तरी! मला एक शें-कडा द्यायलाही तो कांकूं करीत होता. अँ, पण मी कसला

वस्ताद. अगोदरच घेतले काढून आणि मग सांगितलें काय सांगावयाचें तें.

[ जातात. ]

---

# अंक दुसरा.

## प्रवेश ३ ला.

**स्थळ**–मुंबई–ठाकुरद्वार. ( शास्त्रीभिक्षुकमंडळीची सभा. )
**पात्रें**--गणेशभट, सदाशिवभट, कृष्णशास्त्री, बचंभट, व्यंकप्या, मन्शारामशास्त्री, उत्तमभट पुराणिक, गुर्जर देशस्थब्राह्मण, शंकरभट ज्योतिषी, त्र्यंबकभट लटपटे चिटणीस)

**गणेशभट**–या सुधारकांच्या बंडाळ्यांमुळें ब्राह्मणांत ग्रामण्य मात्र विशेष होणार.

**सदाशिवभट**–( तपकीर ओढून व गणेशभटापुढें डबी करून ) घ्या तर खरी अंमळ, कृष्णंभट्टी आहे पुण्याची-तें तर खास होणारच. पण कायरे गणेशभट, त्यांचेच ते पुनर्विवाहाचे तसेच विधवावपनाचे वगैरे शास्त्रार्थ खरे असतील कायरे? कीं हीं ढोंगेंच आपलीं. खरें ह्मणशील तर त्यांचें ह्मणणें कांहीं अंशीं मला बरें वाटतें.

**गणेशभट**–अरे हें काय ह्मणतोस? कलियुगाप्रमाणें तुझीही बुद्धि फिरली आहे वाटतें. अरे, तूं भिक्षुक ना? ठीक. अशा विचारानें आपला उदरनिर्वाह चालणार

कसा? आपणाला शास्त्राधारांशीं व ऱ्या वाईटांशीं पाहून काय कर्तव्य. आपले वडील मूर्ख का होते?

( इतक्यांत चक्रंभट लटपटे कांखेंत कांहीं सुटीं कागदपत्रें व हातांत दौत लेखणी घेऊन धांदलीनें प्रवेश करतात. )

**चक्रंभट**–[ गणेशभटास नमस्कार करून ] एवढीच का सगळी मंडळी. ह्मटलें एव्हां तमाम सभा भरली असेल. ह्मणून सगळीं कागदपत्रें घेऊन धांवत आलों. तों अजून कशास कांहींच ठिकाण नाहीं. [ इतक्यांत कृष्णशास्त्री व गणेशशास्त्री प्रवेश करतात. ]

**गणेशशास्त्री**–पाहिलेंत का शास्त्रीबोवा. चक्रंभटजी कसे अगदीं तयार आहेत ते. चिटणिसीचें काम अगदीं उत्तम करतो. एकूण धर्माभिमानी खरा.

**कृष्णशास्त्री**–मी जो त्याला हातीं धरला आहे तो कांहीं उगाच नाहीं. पूर्ण ओळखून धरला आहे. [ पुढें होऊन] कां चक्रंभटजी जमली आहे का कांहीं मंडळी.

**चक्रंभट**–अजून कुठें आहे मंडळीचा ठाव ठिकाण? समाराधनेचें आमंत्रण असूंद्या, कीं धांवलेच सगळे सोंवळीं भांडीं घेऊन आडवा हात मारायला. खरेंच सांगतों शास्त्रीबोवा, आमच्या ब्राह्मणांना स्वधर्माची कशी ती हौसच राहिली नाहीं.

**गणेशशास्त्री**–येईल हो मंडळी. आल्याशिवाय का राहणार आहे? हो पण शास्त्रीबोवा, आजच्या सभेचे अ-

ध्यक्ष कुणाला नेमायचे? आपण ह्मणत होतां कीं, अध्यक्ष-स्थानीं दुसरे कोणाची नेमणूक करायची ह्मगून.

**कृष्णशास्त्री**—हो बरी आठवण केलीत. मला वाटतें ते गुर्जर मन्शारामशास्त्री यावयाचे आहेत त्यांनाच अध्यक्ष-स्थान द्यावें. तशांत ही सामाजिक कामाची सभा आहे आणि पुढें आपणाला या गुजराथी ब्राह्मणांपासून बराच कार्यभाग साधूनघ्यावयाचा आहे. तेव्हां अशाच प्रकारें त्यांना खुश ठेविलें पाहिजे.

**चक्रंभट**—ठीक आहे. (इकडे तिकडे बघून) हे बघा व्यंकय्या आले.

**कृष्ण० गणेश०**—यावें यावें व्यंकय्या यावें. नमस्कार! नमस्कार!! नमस्कार!!!

**व्यंकय्या**—नमस्कार. हो हो येतो येतो. आपण बसावे आह्मी ह्मगतो. (बसून व बाहेर बघून) हे बघा तुमचा शं-करभटज्योतिषी येतो. हे बघा.

**कृष्ण० व गणे०**—यावें यावें शंकरभटजी यावें. नमस्कार! नमस्कार!! नमस्कार!!!

**गणेशशास्त्री**—ह्या योगानें तरी आपला अलभ्य लाभ झाला ह्मणायचा. कारण, आपलें मकाण पडलें बरेंच लांब, त्यामुळें भेट होणें ह्मणजे जरा दुरापस्तच.

**शंकरभट**—काय करावें, पोट चाललें पाहिजे ना कुठें तरी. [मन्शारामशास्त्री व उत्तमभटशास्त्री प्रवेश करितात.]

**मन्शारामशास्त्री**—आ दक्षिणी लोकोमां सुधारक मंडळी

घणीच निकळी छे. दहाडे दहाडे धर्मनो सत्यानाश थवानो वखत आवेलो छे खरो!

**उत्तमभट**–जोवो, मंडळी केटली आवीने बेठेली छे. आपणने घेरथी निकळतां घणोच वखत लाग्यो.

**चक्रंभट**–शास्त्रीबोवा, ते बघा गुर्जरशास्त्री आले.

**सर्व**–( उठून ) नमोनमः नमोनमः

**मन्शाराम**–आरे तमे उठते कसाला, किमर्थ एवढा श्रम? घेत बसावे बसावे मंडळी बसावे.

**कृष्णशास्त्री**–यांत कसली तसदी, आपल्यासारखीं पात्रें ह्मणजे या काळांत फारच दुर्मिळ.

**मन्शाराम**–आरे कसाचा, तमे काय विद्वान् कमी आहे. असा ह्मणायची मात्र.

**कृष्णंभटजी**–चक्रंभटजी झाली वेळ, आणखी मंडळी यायची आहे ती येईल. सभेचें काम चालूं द्या.

**चक्रंभट**–आमचेकडून तयारी आहे. [ उठून ] आजच्या सभेचें अध्यक्षस्थान मन्शारामशास्त्रीजीनीं स्वीकारावें अशी मंडळीची सूचना आहे.

**मन्शारामशास्त्री**–आरे तमे ए काय करते, कसाचा आह्माला अध्यक्षस्थान देते?

**कृष्णशास्त्री**–चक्रंभटजींचे सूचनेस माझें पूर्ण अनुमोदन आहे.

**गणेशशास्त्री**–माझेंही अनुमोदन आहे.

**त्र्यंकय्या**—माझाही अनुमोदन कृष्णाशास्त्र्याप्रमाणेंच होतो.

**मन्शारामशास्त्री**—तमचा सर्वांचा अनुमोदन आहे तवा तेबी नाही मोडावा.

**कृष्णशास्त्री**—चक्रंभटजी आतां सभेचा उपक्रम चालूं द्या.

**चक्रंभट**—ठीक आहे. आजचा सभा भरण्याचा उद्देश इतकाच आहे कीं, हल्लीं स्वधर्मनाश करण्याला उद्युक्त झालेली व सर्वांत श्रेष्ठ जें ब्रह्मत्व त्यास लांच्छन लावणारी व स्वधर्मबाह्यकृत्यांचा प्रसार करणारी जी सुधारक मंडळी आहे, तिनें स्वधर्म लुप्तप्राय करण्याच्या हेतूनें एक समाज स्थापून ब्राह्मण वर्णांतील विधवा स्त्रियांचीं पुनर्लग्नें लावावीं, व त्यांस विद्याविभूषित करावें अशा धर्मऱ्हासोत्पादक अनेक संस्था स्थापून बराच द्रव्यसंचय केला आहे. जर त्या धर्मच्छेद करणाऱ्या मंडळीस आपण आडकाठी आणली नाहीं तर, त्यांचें प्राबल्य होऊन किंबहुना वर्णसंकरासारखी वेळ येईल. ह्मणून आपण ह्मणजे जे हल्लीं ब्रह्मवृंद बसलों आहोंत त्यांनीं असा विचार केला आहे कीं, सभा भरून त्यांत तूर्त त्यांच्या कृत्यास आडकाठी येण्याची तजवीज करावी. नंतर क्षेत्रस्थादि ब्रह्मवृंदांस बोलावून आणून जंगी जाहीर सभा करून **श्रीजगद्गुरूंकडून** स्वधर्म नीट राहण्याची संस्था स्थापन करवावी. अस्तु. आतां सुधारकांनीं जीं मतें स्थापन केलीं आहेत तीं सभेपुढें सादर करतों. तेणेकरून ब्रह्मवृंदांस तद्विरुद्ध

कोणत्या तजविजी करणें जरूर पडतील त्याचा विचार करण्यास ठीक पडेल, १ विधवावपनानिषेध, २ स्त्री पुनर्विवाहास उत्तेजन, ३ बालविवाहप्रतिबंध, ४ स्त्रीशिक्षणाचा प्रसार, ५ जुन्या मूर्खलोकांच्या वेडगळ चालींचा प्रतिकार. " ह्याप्रमाणें त्यांचीं मतें प्रस्थापित झालीं आहेत. एतद्विरुद्ध जें कांहीं करणें असेल तें सर्वानुमतें पसंत पडल्यास करण्यास ठीक पडेल.

**कृष्णशास्त्री**–[ उठून ] पहिल्यानें आपल्या पक्षाच्या वर्तमान पत्रांतून सर्व ठिकाणच्या ब्रह्मवृंदांस सूचना देववाव्या तसेंच क्षेत्रोक्षेत्रीं पत्रें लिहावीं. मध्यंतरीं साधेल तसा पैसा जमा करण्यास प्रत्येकानें झटावें. मात्र प्रत्येक ब्रह्मवृंदांनीं सत्यस्मरून ह्या कामीं मदत केली पाहिजे. शिवाय देवळोदेवळीं सदर्हू गोष्टींचा उहापोह करून व व्याख्यानें देऊन उलट पक्षाचा मोड केला पाहिजे.

**उत्तमभट**–वः शास्त्रीबोवा तमचे सुचना तर मला फारच रुचले.

**व्यंकय्या**–वः केवढा उत्तम सूचना शास्त्रीबोवांचा! माझा मन अगदीं प्रफुल्लीत झाले.

**शंकरभट**–उहापोह करून व्याख्यानें द्यावयाचीं तीं मला रुचलींच. परंतु पैशाविषयीं विचारकर्तव्य आहे. त्या विषयीं माझ्यानें एकदम मत देववत नाहीं.

**गणेशशास्त्री**–शास्त्रीबोवांचें ह्मणणें सर्वथैव योग्य आहे.

परंतु पैसा जमा करण्याबद्दल सक्ती नसावी. मात्र कोण किती देणार हें पाहण्यासाठीं सह्या घ्याव्या.

**गणेशभट**—आजच्या सभेचा उद्देश उत्तम आहे. परंतु व्याख्यानें देणें तें काम शास्त्रीमंडळीनेंच पत्करावें. कारण, त्यांस शास्त्रार्थाची गरज पडणार तेव्हां त्यांचें व आह्मां भिक्षुकांचें मूळचें वैमनस्य! ह्याशिवाय व्याख्यान देण्याची धिट्टाई ही तर आह्मांमध्यें मुळींच नाहीं, तेव्हां ह्या नियमाचा विचार सभेनें करावा.

**बचंभट**—आमचेंही गणेशभटजींप्रमाणेंच मत आहे.

**कृष्णशास्त्री**—ह्या तुमच्या भाषणावरून कोणाचीच एकवाक्यता नाहीं असें दिसतें. आह्मां ब्राह्मणांच्या हातून कांहीं देखील होणें नाहीं असें जें मीं ह्मणत असतों तें आज उत्तम रीतीनें प्रत्यंतरास आलें. अहो असलें औदासिन्य उपयोगाचें नाहीं, ह्या तुमच्या भागूबाईसारख्या वर्तनानें आपलें ब्रह्मत्व कसें राहणार? इतका विचारदेखील तुमच्या मनांत येऊं नये अँ.

**मन्शारामशास्त्री**—आरे ये समस्तब्रह्मवृंद तमे असा काय भाषण करते. तमे जो असा करेल तो हे तमचा सुधारक मंडळी धर्मनो सत्यानाश करेल. असा मला वाटतो.

**चक्रंभट**—(रागानें) पाहिलेंत, काय सांगावें ह्या मंडळीला? ज्ञान ह्मणजे काय वस्तु असते ती ह्यांच्या स्वप्नींसुद्धां नाहीं. आतां गणेशशास्त्र्यांच्या सुचनेंप्रमाणें यादी तरी फिरवून पहातों. ( सर्वांपुढें यादी फिरवितो. कुठें कांहीं मिळत नाहीं असें

पाहून मन्शारामशास्त्र्यांपुढें यादी ठेवतो. ) मंडळीचें दातृत्व दिसून आलें. आतां आपलेकडून तरी कांहीं पडूंद्या.

**मन्शारामशास्त्री**–(हसून) जवां तमचा दक्षिणी काईबी देत नाहीं तवां आमचा तर लांब आहे. तोबी आमी खुशीनी देल. ये यादीच कशाला पाहिजे. ये समदा "आरंभशूराः खलु दाक्षिणात्याः" असा झाला.

**उत्तमभट**–जवा तमचे तमे एकमत करेल तवां आमी देल. आमी तमचे खुशी बायेर नाहीं.

**कृष्णशास्त्री**–[ आपल्याशींच रागानें ] गुलामांनीं सभा भरा, सभा भरा, अशी एक सारखी ओरड घातली, व शेवटीं होतें नव्हतें तेवढें फजितीचें जिणें मात्र करून घेतलें. असो. वेळ येईल तेव्हां हा कृष्णशास्त्री पाहून घेईल. (उघड) चक्रंभटजी भिऊं नका. जरी आज पैसा जमला नाहीं तरी लोकांच्या घरोघर जाऊन आंकडे मिळवूं. अशा महत्कार्याला भिक्षुक मंडळी तें कायदेणार? अस्तु. आजच्या सभेला वेदशास्त्र संपन्न वेदमूर्ति मन्शारामशास्त्री व उत्तम भट पुराणिक यांनीं येण्याची तस्दी घेतल्यामुळें सर्व सभा त्यांची फार आभारी आहे.

(पडदा पडतो.)

---

# अंक दुसरा

## प्रवेश ४ था.

**स्थळ**—मुंबई–बचंभटाचें घर

**पात्रें**—सुगुणी-बचंभटाची मुलगी, वाराणशी व ठकी–सुगुणीच्या मैत्रिणी.

**वाराणशी**–( सुगुणीच्या हाताला ओढून ) अग हो, मला सगळं ठाऊक आहे. तुझं लगीन झालं ह्मणून तूं आमच्या बरोबर खेळूं सुद्धां का नयेस? एवढी तूं आजच मोठी झालीस वाटतं. पण बरं झालं. ह्मातार्‍याचीच बायको आहेस ह्मणून! नाहीं तर काय करतीस कोणजाणे. नाकानेंच कांदे सोलूं लागतीस हो.

**ठकी**– अग पण दुसरं तुला माहीत आहे का, काय झालं आहे तें? हिच्या किं नाहीं बापानें हजारका कायसे रुपये घेऊन हिला विकली हो त्या पिलंभटाला. उगीच नाहीं झाली ह्मातार्‍या नवर्‍याची बायको, बरं झालं बाई, नाहीं तर ही किं नाहीं सगळ्यांनाच जशी आजीबाईसारखी चिडवीत असे हो.

**वाराणशी**– हो पण सुगुणे, तूं लग्नांत उखाणाग कसा घेतलास. तो घे पाहूं आधीं ह्मणजे मग सोडूं तुला.

**ठकी**–( सुगुणी उखाणा घेत नाहींसें पाहून ) अग तो नस-

शील घेत तर हा घे. " पडक्या भिंतीला लिंपू किती नि ह्मातारे पिलंभटजींना मी जपूं किती "

**वाराणशी**–घेईसनाग सुगुणे. ठकीनें सांगितलेला जर तुला आवडत नसला, तर मी सांगतें हा घे. "आधारावर मदार नि पिलंभटजी माझ्या कुंकवाला आधार," चल घे लौकर नि जा परती. न खेळलीस तरी चालेल आमच्या बरोबर.

**ठकी**–अग ती कसा घेईल उखाणा? आमच्या शेजारची ती गंगूताई ती ह्मणत होती कीं, सुगुणीचा नवरा अगदीं जख्खड ह्मातारा आहे. तो सगळादिवस खो खो खोंकून एवढालीं कफाचीं मडकीं भरतो. इश्शगबाई, सुगुणे, आतां उद्यां तूं नवऱ्याच्या घरीं गेलीस किं नाहीं ह्मणजे तीं कफाचीं मडकीं तुलाच धुवावीं लागतील हो! मग किं नाहीं ठके, ही सुगुणी अगदींच ओंगळ होईल हो, जवळसुद्धां बसवूं नये अशी. ह्मणूनच ती नांव घ्यायला लाजते.

**वाराणशी**–ईश्श ग बाई! ओः (ओकूं लागते) मी नाहीं आतां ह्या सुगुणीजवळ बसणार. मला किं नाहीं घाणीचा अगदीं अगदीं कंटाळा आहे.

**ठकी**–मलाही बाई तुझेसारखाच कंटाळा आहे. हो, पण तुला ठाऊक आहे का ही ह्मण? "साळीचा भात पंक्तीला, अन् ह्मातारा नवरा गमतीला." (दोघी नाचतात.)

**वाराणशी**–(सुगुणी रडते तें पाहून) गडे ठके, बघ बाई ही सुगुणी रडते आहे. मी नाहीं बाई ह्या सुगुणी-

जवळ उभी रहात. ही लगीन झाल्यापासून मोठी चिरडखोर झाली आहे हो.

**ठकी**–खरंच बाई सुगुणे, काय झालं ग तुला एवढं रडायला, तुला मारलं का कुणी? तुझं लगीन झालं ह्मणून केली बाई जराशी थट्टा. एवढा जर तुला राग येतो, तर उद्यांपासून नाहीं यायच्या तुझ्याबरोबर खेळायला. कायग बाई रडते आहे तरी. बरें तर बस रडत. आह्मीं तरी कशाला राहूं? (सुगुणी रडूं लागते तें पाहून) गडे वाराणशी! आजपासून सुगुणीची गडी थुई! (असें ह्मणून दोघी थुई करितात)

**वाराणशी**–चल गडे (दोघी जातात.)

**सुगुणी**–(रडणें बंद करून आपल्याशींच) माझ्या बाबांनीं आई नको नको ह्मणत असतां त्या ह्मातार्‍याला मला विकलं नसतं तर ह्या माझ्या मैत्रिणी माझी अशी थट्टा कां करत्या! हो, पण त्या ठकीच्या ह्मणण्याप्रमाणें खरेंच का मला कफाचीं मडकीं धुवावीं लागणार? इश्शग बाई, ज्याचा मला मनापासून कंटाळा तेंच ना माझ्या कपाळीं यावें? असें मी देवाच्या घरीं कोणतें पाप केलें होतें कोण जाणें. आतां मला जन्मभर दुःख कादावें लागणार. असो. आतां त्याचें दुःख करून काय होणार आहे?

[ जाते. ]

---

# अंक दुसरा



## प्रवेश ९ वा.

**स्थळ**–मुंबई–रस्ता.

**पात्रें**–गोपाळराव. (प्रवेश करतात)

**गोपाळराव**=( स्वतःशींच ) माझ्या पत्राचें विनायकरावांकडून योग्य उत्तर आलें. परंतु ह्या गोष्टीपासून कृष्णशास्त्र्यांस आनंद न होतां उलट दुःख मात्र होईल. एकंदरींत विनायकरावांस स्वतंत्रपणें लग्न करावें लागणार. चिंता नाहीं. बापूसाहेबांनीं सांगितल्याप्रमाणें सर्व लग्नाची तयारी आपणच करावी. ह्मणजे त्यांस कोणत्याही प्रकारें अडचण पडणार नाहीं. [ घड्याळाकडे पाहून ] अरे इतक्यांत चार वाजले. इकडेस ठरल्या प्रमाणें पुण्यास जाऊन विनायकरावांस समक्ष कळवावें ह्मणजे त्यांसही काळजी करावी लागणार नाहीं. तशांत दिवसही फार थोडे राहिले आहेत? तेव्हां पांचाच्या डाकेच्या गाडीनें जावें हेंच ठीक

[ जातो. ]

**अंक दुसरा समाप्त.**





# अंक तिसरा.

## प्रवेश पहिला.

**स्थळ**–मुंबई–कृष्णशास्त्र्याचें घर.

**पात्रें**–कृष्णशास्त्री, चक्रंभट, राधाबाई, [ कृष्णशास्त्र्याची बायको ] टपालचा शिपाई. ( बसलेअसतां पडदा उघडतो. )

**चक्रंभट**–काय सांगूं शास्त्रीबोवा, आपल्या आज्ञेप्रमाणें सर्वत्र फिरलों पण नकारावांचून दुसरें कांहीं नाहीं. बड्या-मंडळीकडे जावें तर "**वदामि बहुवाक्यानि । न ददामि कपर्दिकां ॥**" ही स्थिति! सारांश, त्यांचे मतें आपण मूर्ख ठरतों. कोणी ह्मणतात ते व तुह्मीं एकत्र जमून वाद-विवाद करा. व जो जिंकेल त्याप्रमाणें चाला. ह्मणजे असले द्राविडीप्राणायाम अर्थात चुकतील. खरेंच सांगतों शास्त्रीबोवा, ह्या इंग्रजी विद्येनें सगळा नाश मांडला आहे. तशांत क्षेत्रस्थांसही ह्या गोष्टीची जरूर नाहीं. व त्याप्रमाणें त्यांनीं चक्क जबाबही दिलाच. कां नाहीं देणार, क्षेत्रांत पैशाला काय उणें. ? पण थांबा ह्मणावें—

**कृष्णशास्त्री**–अरे असे भितां काय! चक्रंभटजी हल्लीं लोकच झाले आहेत धर्मभ्रष्ट. काय करूंहो आज पेशवाई

असूंद्यायची होती कीं, दाखविलेंच असतें या लोकांना; पण हें पडलें इंग्रजी राज्य, तरी पण कांहीं चिंता नाहीं. हातीं धरलेलें काम शेवटास नेतोंच कीं नाहीं बघा.

**चक्रंभट**—हें तर उघड आहे. पण ह्या क्षेत्रस्थ ब्राह्मणांचें मला मोठें आश्चर्य वाटतें.

**कृष्णशास्त्री**—जाऊंद्याहो. काय मोठेंसें घेऊन बसलां आहांत. [ इतक्यांत टपालाचा शिपाई येतो. ]

**टपालाचा शिपाई**—( पत्रावरील नांव वाचून ) तीर्थस्वरूप वेदशास्त्र संपन्न वेदमूर्ति राजमान्य राजश्री: कृष्णशास्त्री बिन् सदाशिव भट्ट शास्त्री कुणी राहतात एथें?

**कृष्णशास्त्री**—( पुढें होऊन ) होय मीच ( अक्षराकडे पाहून ) हें विनायकाचेंच पत्र असावें. ( फोडून ) अरे हें कुंकुमंडित कां! ( वाचून ) हा कुलांगारा. जन्मतांच मृत झाला असतास तरी उत्तम होतें. लोकांना दोष तरी कां ह्मणून द्यायचा. आमच्या बहिणीचे चिरंजिवांनीं काय उजेड लावले ते पहा.

**चक्रंभट**—काय झालें तरी काय! विधवेबरोबर लग्न लावलें कीं काय? लावतील बोवा, हे इंग्रजी शिकलेले काय करतील याचा नेम कोणी द्यावा?

**कृष्णशास्त्री**—छे तसें कांहीं नाहीं. तुळशींत भांगेचें रोप व्हावें तद्वत झालें. ज्या गोष्टींचा समूळ नाश व्हावा एतदर्थ जो मी जिवापाड यत्नकरीत होतों, त्याच गोष्टी

माझ्या घरांत व्हाव्या काय ? पत्र पाठवून माझ्या क्रोधाग्नीला मात्र भडकावून सोडिलें! हें घ्या, वाचा. बाळ्यानें काय दिवे लावले आहेत ते! ( चक्रंभटाचे आंगावर पत्र टाकतो. )

**चक्रंभट**–( पत्र वाचून आश्चर्यानें ) काय बापुसाहेब ना ? तवंड्याच्या मुलीबरोबर विनायक लग्न करणार आणि पुनः या मुंबईत? हर! हर!!

**कृष्णशास्त्री**–असें त्याला करावयाचें ह्मणूनच लग्नाची गोष्ट काढली कीं, कांहीं तरी अडचण उभी करी. हीं त्याचीं चिन्हें मला पूर्वींच कळून आलीं होतीं. पण ह्मटलें असो.

**चक्रंभट**–दिवसानुदिवस कालमानच असें होत चाललें आहे. आतां संताप करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. आपण आपलें कर्तव्य योग्य बजावलेंत. **लालयेत्पंचवर्षाणि ॥ दशवर्षाणिताडयेत् ॥ प्राप्तेतुषोडशेवर्षे ॥ पुत्रेमित्रवदाचरेत् ॥** अर्थात् आपला इलाज संपलाच या उप्पर मुलांना इंग्रजी शिकविणें ह्मणजे आपल्या हातांनींच आपल्या धर्माचा नाश करण्यास सिद्ध होणें.

**कृष्णशास्त्री**–मी कुठें इंग्रजी शिकविण्यास तयार होतों, पण त्याच्या मास्तरापुढें माझा नाइलाज झाला. ह्मणे कालमानानुरूप चार पुस्तकें होऊंद्याच इंग्रजीचीं. शास्त्र शिकविणें असेल तें खुशाल शिकवा. व साधेल तसें घरीं काव्यही सांगत जा. ह्मणजे झालें. इतकी सवड मिळतांच चाललाच त्याचा क्रम वृद्धिंगत होत. इंग्रजी

विद्येवांचून त्यास कांहीं सुचेनासें झालें. एवढी मेहनत जर शास्त्रग्रंथांवर झाली असती तर, आज जबरदस्त विद्वान् झाला असता इतकेंच नव्हे तर, काशीपासून रामेश्वरापर्यंत त्याच्या विद्वत्तेचा प्रकाश पडून सर्वतोमुखीं कुलदीपक ह्मटला गेला असता. सारांश, मुलांस इंग्रजी शिकविणें ह्मणजे आपल्या हातांनीं धर्मनाश करणें खराच. ह्यासाठीं **न वदेद्यावनींभाषां ॥ प्राणैःकंठगतैरपि ॥** ह्याला ह्मणतात दूरदृष्टि. पण करणार काय? आमच्या लोकांपुढें इलाज नाहीं.

**चक्रंभट**—जाऊंद्याहो. व्हायचें तें होऊन गेलें. आतां त्याबद्दल दुःख करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. बरें शास्त्रीबोवा, अंमळ भुलेश्वराकडे जायचें आहे. (असें ह्मणून नमस्कार करून जातो, व राधाबाई येते.)

**राधाबाई**—मघांपास्न विनायकाबद्दल इतकं काय चाललं आहे. त्यानें केलं तरी काय असं?

**कृष्णशास्त्री**—केलें आहे कपाळ! आपण त्याला लग्नाविषयीं बोलत असूं तेव्हां त्याची सबब आपली तयार असेच. त्याचें प्रत्यंतर आज आलें.

**राधाबाई**—ह्मणजे? तिकडे त्यानें आपल्या मनाजोगत्या मुलीबरोबर लगीन बिगीन करण्याचें केलं कीं काय?

**कृष्णशास्त्री**—तसें करता तरी ठीक होतें पण, त्या बापूसाहेबांच्या अठरा वर्षांच्या घोडीबरोबर लग्न करावयाचें

ठरवून तिथीनिश्चय करून हें बत्र पत्र पाठविलें आहे. आग लागो त्याच्या कृत्याला.

**राधाबाई**–( आश्चर्यानें ) बापूसाहेबांच्या मुलीबरोबर! इश्श ग बाई! लगीन आणि एयढ्या घोडनवरी बरोबर? काय बाई तरी चमत्कार!!!

**कृष्णशास्त्री**–जाऊं दे ग आतां त्याचें नांव सुद्धां काढूं नकोस मजजवळ. गाढवानें कुळाला बट्टा मात्र लाविला. बरें झालें बाळ्याचे सोहाळे पाहण्याला आई राहिली नाहीं. नाहीं तर तिला मात्र मरणापेक्षां जास्त दुःख झालें असतें. त्याच्या पत्रावरून तो आज संध्याकाळींच येथें येणार आहे; तेव्हां येत असलीस तर चल मजबरोबर पुण्यास जांवईबोवांच्या समाचाराला. ह्मणजे आयतेंच् काम होईल. ( पडदा पडतो. )

---

# अंक तिसरा

## प्रवेश १ ला.

**स्थळ**–मुंबई–बापूसाहेब नातवंडे वकीलांचा बंगला.

**पात्रें**–सुशिला, बापूसाहेबांची मुलगी. चिमूताई व सखुताई सुशिलेच्या मैत्रिणी.

**सखूताई**–ऐकलं का चिमूताई? उद्यां सुशिलेचं लग्न झाल्यावर ती आपणाला विचारणार सुद्धां नाहीं हो. मग ती आपल्याच तोऱ्यांत असावयाची.

**चिमूताई**—खरेंच बाई न कां विचारिना आपणाला? सुखान नादात ह्मणेंज झालें.

**सुशिला**—करा वाटेल तितकी थट्टा. आहेत तुमचे दोन दिवस तोंपर्यंत कराल. तुमचीं पण लग्नं व्हायचीं आहेत.

**चिमूताई**—बरं बाई, नाहीं करणार. पण, मी विचारतें तेवढें खरें सांगशीलना आह्मांला?

**सुशिला**—खरें न सांगायलाग काय झालं? आजपर्यंत तुमच्याजवळ कुठलं कांहीं न सांगतां चोरून ठेवलं होतं का मनांत?

**चिमूताई**—हेंच खरं तर दे बघूं वचन.

**सुशिला**—वचन तें काय ह्मणून द्यायचें? हें बघा कायतें? हिचा आपला सदांचा नवा कायदा.

**सखूताई**—देईनास परतें, तुझं काय जातं त्यांत.

**सुशिला**—( वचन देऊन ) हें घे बाई. विचार आतां काय विचारते आहेस तें.

**चिमूताई**—सांगशील ना पण खरें? बघ हो, नाहीं तर फिरशील मग! (असें ह्मणून सखूताईस विच्यारण्याची खूण करते)

**सखूताई**—विचारिसना एकदांचें काय तुझ्या मनांत आहे तें? ती तयार आहे हो तुला सांगायला.

**सुशिला**—आतां कां थांबल्यात चिमूताई तुह्मीं?

**सखूताई**—समजलीस का तूं ती काय विचारणार आहे तें? तुला बापूसाहेबांनीं जो नवरा पाहिला आहे,तो तुझ्या मनाला आवडला किं नाहीं हें विचारते आहे हो ती.

**सुशिला**–( लाजल्यासारखें करून ) हें ग काय असलं तुझं विचारणं.? मला नाहीं बाई समजत.

**चिमूताई**–आतां उगीच लाजूं नका वरं सुशीलाबाई तुह्मी.

**सुशिला**–अग उद्यां तुमच्या आईबापांनीं तुमच्या अनुरूप वरास जर तुह्मांला दिल्या, तर तुह्मी नाखूश अशा नाहींना होणार ? कारण आपल्या मुलींच्या खऱ्या सुखाकडे पूर्ण नजर दिल्यावांचून सुशिक्षित आईबापें कधींही पुढें पाऊल टाकणार नाहींत. यांतच समजा.

**सखूताई**–हें समजतें आहेहो आह्मांला. आपल्या आईबापांस जें आवडलं तें आपणांलाही आवडलं पाहिजे. हेंच शहाणपणाचं काम.

**सुशिला**–( स्वतःशींच ) ह्यांच्याजवळ तरी मी काय ह्मणून लाजूं. ( उघड ) तुह्मीं माझ्या लहानपणापासूनच्या जिवाच्या मैत्रिणी. मला जर सुख तर तुह्मांला सुख. तेव्हां तुमचे जवळ कां ह्मणून मी चोरुन ठेवूं ? माझ्या मनांत जसें होतें त्या पेक्षांही जास्त–( असें अर्धेंच ह्मणून लाजते ) झालीना आतां तुमची हौस पूर्ण ?

**चिमू व सखू**–झाली हो बाई आतां आमची हौस पूर्ण. आतां तुझ्या–( इतक्यांत आंतून हांक ऐकूं येते. )

**सुशिला**–चल बाई ! आई घरांत हाक मारते आहे.

**चिमूताई**–चल बाई आजची रात्र देखील अशीच सगळी गडबडींत जायची. ( असें ह्मणून जातात. )

---

# अंक तिसरा

## प्रवेश ३ रा.

**स्थळ**—मुंबई– रस्ता.

**पात्रें**—गणेशभट आणि सदाशिवभट,

**गणेशभट**–( ढेंकरादेत व पोटावर हात फिरवून ) नाहीं नाहीं ह्मणतां, बापुसाहेब नातवंडे ह्यांच्या मुलीच्या लग्नांत बरीच भिक्षुक मंडळी जमली होती. असो पण दक्षिणा बरीक चांगली वांटली. ती चकचकीत जाडी दक्षणा माझे हातांत पडतांच मी आशीर्वाद देखील मोठ्या आनंदानें दिला.

**सदाशिवभट**–एकंदरींत दोन्ही पक्षांकडून दक्षणा चांगली वांटली गेली. भोजनाचा बेत तर अगदीं सर्वोत्कृष्टच. पक्वान्नें काय, भाज्या काय, फारच रुचकर. मी तर आज आकंठ जेवलों.

**गणेशभट**–असा उत्तम बेत ठेवणारे हल्लींच्या काळांत दुर्मिळ. काय तें लोणकढें साजूक तूप? माझी तर बोवा शेवटीं शेवटीं तृप्तीच होईना ह्मणून दोन तीन द्रोण प्यालोंच. जेवतांना मला तर पेशवाईतील गोष्टींची आठवण झाली.

**सदाशिवभट**–खरेंच, त्यावेळीं ब्राह्मणांनां एक दिडकीसाठीं दारोदार का रखडावें लागत असे? जावें आणि बसावें श्रीमंतांकडेस राजाचें अभीष्ट चिंतन करीत, कीं चु-

कलीच कडकडीत माध्यान्हकाळाची दगदग. ऋषींसारखे पुण्यवानच ह्मणायचे ते.

**गणेशभट**—आतां त्या गोष्टी हव्या आहेत कशाला? हल्लींच्या विपत्तींत असले दाते मिळणें हेंच भाग्य.

**सदाशिवभट**—हो बरी आठवण झाली. कायरे गणेशभट, तो गुलाम भुसकुट्या बचंभट बापूसाहेबांची केवढी तरी निंदा करीत असे. ह्मणे ते बहिष्कारांतलेच आहेत. त्यांजकडील दिडकी दक्षणाही घेऊं नये. अशा फुकाच्या बाता मारतां मारतां, आतां तर आपल्या मुलास वधूपक्षाकडील उपाध्याय बनविला आहे. ठीक झालें कृष्णशास्त्री गावांत नाहींत ह्मणून. त्यांचा जामात पुण्यास अत्यावस्थ अजारी आहे. नाहीं तर भिक्षुकमंडळीला इकडे येण्यास थोडी आडकाठीच झाली असती.

**गणेशभट**—तरी देखील चोरून छपून आलीच असती. सुधारक झाले आणि कुणी झाले (बोटांनीं पैशाची खूण दाखवून) एवढी गोष्ट खेरीजकरून ते आणि आह्मी निराळे.

**सदाशिवभट**—उघड आहे. ज्या गोष्टीपासून लभ्यांश होण्याचा संभव त्या गोष्टीचा द्वेष आपणां भिक्षुकांस काय उपयोगी?

**गणेशभट**—हें तर खरेंच पण, धर्माचा कट्टा अभिमान मिरविणाऱ्या शास्त्रीमंडळाचीही बरीच गर्दी होती. मारे बोटांत आंगठ्या, सल्ले, आंगावर शालजोड्या, रेंखीव केशरी गंधें, डोकीला जरीपदराचीं लफेदार पैठणीं

पागोटीं घालून दक्षणेच्या आशेनें दोंदें हालवीत हालवीत थोडी का धेंडें आलीं होती. कांहीं जण भोजनासही उठले होते.

**सदाशिवभट**–द्रव्याशेपुढें सर्वत्र कांहीं लटपटतें. मग शास्त्र्यांची ती काय कथा. असो. पण, बचंभटाला बरात्र लाट साधला ह्मणायचा. दक्षणा जर इतकी वांटली आहे, तर दुसरी मिळकत ह्मणजे कांहीं कमी असेलसें वाटत नाहीं. गुलामाचा इकडे कसा प्रवेश झाला नकळे!

**गणेशभट**–तो बराच धोरणी असून तसाच खटपटीही आहे. पण उत्पन्नाविषयींचें माझ्यानें नक्की सांगवत नाहीं.

**सदाशिवभट**–हेंही खरेंच. "ह्मणे कोण ठेवतो आहे गणपतीच्या विड्यावरील दक्षणा" अशानें भिक्षुकाची तेवढी कमाई बुडालीच कीं नाहीं?

**गणेशभट**–गणपतीचे विड्यावरील दक्षणा, वरुणकलशांतील चवली, ही सगळी ब्राह्मणाच्या उदरपोषणाची मांडण आहे.

**सदाशिवभट**–अरे पण उद्यां बापूसाहेबांच्या व्याह्यांकडील समाराधनेचें आमंत्रण आहे.

**गणेशभट**–व्याही कुठले काढलेस? कांहीं अंशीं कृष्णशास्त्री त्यांचे व्याही. पण त्यांच्या भाच्यानें त्यांचें अनुमोदन घेतल्यावांचून बापूसाहेबांच्या मुलीबरोबर लग्न केलें ह्मणतात. आणि हें ही खरेंच कीं कृष्णशास्त्र्यांचा ह्या गोष्टीस रुकारही पडला नसता. (आठवल्या सारखें करून)

मी येथें गोष्टी बोलत काय राहिलों? पिलंभटाचा ... " आमचे
तंभट माझी वाट पहात असेल. उद्यां षड्मासिक आहे.

**सदाशिवभट**--इतक्यांत सहा महिनें झाले अँ! त्रिच्या-ऱ्यानें मोठ्या हौसेनें लग्न केलं होतें. पण पहा काय योगायोगतो! लग्न होऊन पुरे दोन महिने होत नाहींत तोंच नहाण येऊन, ऋतुशांती होऊन, पुरा एक महिना होत नाहीं, तोंच स्वारीनें आपलें गवाळें आटपलें. एकंदरींत बचंभटाच्या मुलीचें दुर्दैव खरें. आणि बचंभटही ह्मणतात मुलाचें लग्न केल्यापासून आजारी होतां होतां आतां तर अगदींच बेतावर आला आहे. नाहींतर बापुसाहेबां कडील कार्य मुलावर टाकता ना.

**गणेशभट**–हें तर खरेंच. पण खरें कायरे? कीं, बचंभटानें पिलंभट मेल्यावर आपल्या मुलगीला घरांत आणल्यामुळें, त्याचें आणि त्याच्या मुलाचें वांकडें पडलें आहे. आणि ह्मणे गणेशशास्त्र्यांची मुलगी आपल्या मुलास मिळावी ह्मणून कृष्णशास्त्र्यांच्या मध्यस्तीनें केवढी खटपट केली. तेव्हां कुठें लग्न झालें. पण ती मुलगी चिरंजीवास नापसंत आहे. ह्यामुळें बापलेकांत रोज भांडणें चाललीं आहेत ह्मणतात.

**सदाशिवभट**–चलायचींच तीं. मुलगा अंमळ विचित्र आहे. एकंदरींत पिलंभटाच्या बायकोचें नशीब कमीच खरें.

( जातात )

---

पागोटीं घा
थे

# अंक तिसरा.

## प्रवेश ४ था.

**स्थळ**–मुंबई–एक बंगला.

**पात्रें**–विनायकराव-कृष्णशास्त्र्यांचा भाचा व बापुसाहेबांचा जांवई. गोपाळराव, दामूअण्णा.

**विनायकराव**–( लोडाशीं टेकून बसले असतां स्वतःशींच ) परमेश्वर कृपेनें सर्व कांहीं यथास्थित झालें. मनाजोगती सुशिक्षित सुंदर व मोठी अशी बायको मिळाली, चांगल्या गृहस्थाशीं आप्तपणा झाला, परंतु ह्या कृत्यांत माझें वर्तन मामांच्या मनाविरुद्ध झालें, तेणेंकरून त्यांच्या अवकृपेस मात्र पात्र झालों. असो चिंता नाहीं. ते जांवयाच्या समाचारासाठीं पुण्यास गेले आहेत. तेव्हां तिकडेच त्यांची भेट होईल. ( इतक्यांत दामूअण्णा व गोपाळराव येतात त्यांस पाहून ) यावें.

**गोपाळराव**—उद्यां पुण्यास जाण्याचा नक्की बेत झाला वाटतं ?

**विनायकराव**—हो गेलेंच पाहिजे. इकडे येऊन एक महिना झाला. आमच्या मामांचे जामात विशेष आजारी झाल्याचें ऐकतों. आणि तेही तिकडेच आहेत.

**दामूअण्णा**—छेः कमाल आहे बोवा तुमच्या मामांपुढें. जबरदस्त दुराग्रही पुरुष!

**विनायकराव**—'स्वभावाला औषध नाहीं.'' आमचें तें खरें हा त्यांचा निग्रह! अस्तु. पण तुह्मी आतां कोणता विचार करणार?

**दामूअण्णा**—होईल तितकें करून पुनर्विवाहच करायचा.

**गोपाळराव**—विनायकरावजी! अण्णाच्या दृढनिश्चयांत बदल ह्मणून कधींच व्हायचा नाहीं.

**विनायकराव**—असेंच पाहिजे. तरच कांहीं सुधारणा झाल्यास होईल. असो या योगानें तरी वैधव्यरूप पंकांत बुडालेल्या अनाथ आर्य भगीनींचा उर्जित काल येईल.

(पडदा पडतो)

---

# अंक तिसरा.



## प्रवेश ९ वा.

**स्थळ**—मुंबई.

**पात्रें**—वचंभटाचा मुलगा मार्तंड.

**मार्तंडराव**—(स्वतःशींच) बाबा वारल्याला पाऊण महिना होत आला. आतां मनाप्रमाणें एकेक गोष्टीची निरवानिरव केली पाहिजे. पहिल्यानें बहीण असली ह्मणून काय झालें? आज आठ नऊ महिनें होत आले. मुंबई सारख्या शहरांत खायला घालतों आहोंत. परंतु तें कांहींच नाहीं. लोकांच्या बहीणी बघाव्या तर

कोणी स्वयंपाकाला बाई-ह्मणून राहिल्या आहेत, कोणी खाणावळी घातल्या आहेत; सारांश, कुठून तरी आपलें पोटभरून उलट भावाला मदत करतात. आणि आमच्या-कडे बघावें तर उलटा न्याय! तरी एक ठीक झालें. लौ-करच आटपली ह्मणून! नाहीं तर तिची सावत्र-मुलगी आह्मांलाच पोसावी लागली असती. एकंदरींत आईमुळें हे सर्व खेळ चालले आहेत. आतां ही भीड पुरे झाली. (वि-चार केलासें करून) ज्यावेळीं तिचा नवरा वारला त्यावेळीं नग दागिन्यासुद्धां तीनशें साडेतिनश्यांचा विषय जवळ निघाला. त्यांतही त्यांच्या और्ध्वदेहिक कर्मासाठी त्याच्या भाऊबंदांनीं अडविल्यामुळें सरासरी एक शेंकडा तिच्या दिराच्या [ सितंभटाच्या ] हवालीं केला. बाकी राहिले अ-डिचशें. त्यावरच सगळ्या उड्या चालल्या आहेत. पण, ते पुरणार किती दिवस! ह्या साठींच तर खाणावळ घालून देण्याच्या विचारांत आहें. लागतील पंचवीस तीस रुपये पहिल्यानें. चार चांगली मंडळी जेवावयास यायला लागली कीं, खाणावळ चालून आणखीं आईच्या मदतीनें फरा-ळाच्या सामानाचें दुकानही काढतां येईल. ह्मणजे घरखर्च परभारें सुटून भिक्षुकीचें उत्पन्न अचानक पदरांत पडेल. पण, हें जमावें कसें? खाणावळीचें नांव काढलें पुरे, कीं, पडलीच कपाळास आंठी. ह्मणें 'टाक माझे रुपये ह्मणजे ही मी चाललें. मला वाटेल तर मी खाणावळ घालीन किंवा वाटेल तें करीन. मी आहें आणि माझें नशीब आहे. मी

तुझ्या घरांत आहें ती नसलें ह्मणजे झालें कीं नाहीं तुझ्या मनाजोगतें? तुला वाटत असेल, पण मी ह्मणून तुझ्या ओंजळीनें पाणी प्यायचीं नाहीं.' हा वर दम! चिंता नाहीं. आणखी एक दोन वेळ नीट रीतीनें सांगून पाहूं. जर नच ऐकलें तर (रागानें) दाहीं दिशा मोकळ्या आहेत समज. मग पाहातों आहें तुझा तोरा! तिला आईचा मोठा आधार असल्या-मुळें माझें बोलणें ह्मणजे जम्मेंत नाहीं आणि खर्चांत नाहीं असें ती समजते. ठीक आहे. ऐकूं तर नकोस मग पहा कशी मजा करतों ती? आईलाही सक्त ताकीद देईन कीं, जर माझे जवळ तुला नीटपणें रहावयाचें असलें तर तिच्याशीं कोणत्याही गोष्टीचा संबंध नठेवतां अगर कोण-त्याही प्रकारची मदत न देतां तुला राहिलें पाहिजे. नाहीं तर तुझें माझें जुगणार नाहीं, ह्मणजे आपोआप सर्व कांहीं जुळून येईल.

(जातो)

---

# अंक तिसरा

## प्रवेश ६ वा.

**स्थळ**--मुंबई. कृष्णशास्त्र्याचें घर.

**पात्रें**—कृष्णशास्त्री.

**कृष्णशास्त्री**—"वैद्या वदन्ति कफपित्तमरुद्विका-रान्॥ ज्ज्योतिर्विदो ग्रहगातिं परिवर्तयन्ति ॥ भूताभिषंग इति भूतविदो वदन्ति ॥ प्राचीन कर्म बलवन्मुनयो

वदन्ति॥ ह्या सुभाषितकाराच्या ह्मणण्याप्रमाणें आज माझी स्थिति होऊन गेली आहे. नामांकित व हुशार वैद्यांनीं आपली होती नव्हती तेवढी शिकस्त केली. ज्योतिषांनीं ग्रहपीडा शनमार्थ जपजाप्य, दानेंव्रतें जेवढीं ह्मणून सांगितलीं तेवढीं केलीं, भुतेंखेतें ह्यांनांही बळी दिले. गंडे दोरे बांधले, पण सर्व व्यर्थ. ह्या सगळ्या खटपटींत पाण्यासारखा पैशाचा व्यय केला. त्यांतून कांहीं तरी उपयोगी पडावयाचें होतें. पण तें व्हावें कसें? "प्राचीन कर्म बलवन् मुनयो वदान्ति" हें सुभाषितकारांचें ह्मणणें अगदीं यथार्थ आहे. एकूण आपल्या एकुलत्या एक मुलीला सौख्य व्हावें एतदर्थ हर तऱ्हा केल्या. लग्नापूर्वी उभयतांचीं टिप्पणें पाहिलीं, तरी देखील व्हायचें तें झालेंच! सारांश, दैवाची गति विचित्र आहे ह्मणतात तें कांहीं खोटें नाहीं. हर हर, आज या दुःखानें हें सर्व जग मला शून्यवत् झालें आहे. लांब कशाला, हेंच माझें घर आज मी आल्या वेळापासून मला खावयाला येत आहे असें वाटतें. कां नाहीं येणार? प्रत्यक्ष पोटचा गोळा आणि त्याजवर पडलेली आकाशाची कुऱ्हाड, माझ्यानें कशी पाहवणार? हाय हाय, बाळे यमुने, आतां तुझें हें दुःख माझ्यानें कसें पाहवेल? हर! हर!! काल ह्याच वेळीं चाललेले तुझे अनिवार शोकरव ऐकून माझें हृदय तुझ्या दुःखाघातानें विदारण झालें आहे. लोकरीतीकरतां तशीच तुला तिकडे टाकून मी इकडेस आलों परंतु, तूं आतां कोणत्या स्थितींत

असशील ह्याचे दुःखमय अनेक देखावे माझ्या डोळ्यांसमोर फिरूं लागले आहेत. (थांबून) "मनसा चिंतितंकार्यं दैवमन्यत्र चिंतयेत्" थोड्या दिवसांपूर्वी मी कोणत्या आनंदांत होतों, आणि आज कोणत्या दुःखांत आहें! एतावता भवितव्यतेपुढें कोणाचें कांहीं चालावयाचें नाहीं. तेव्हां श्रीशंकर ठेवील तसेंच राहणें भाग आहे.

( पडदा पडतो )

---

# अंक तिसरा.



## प्रवेश ७ वा.

**स्थळ**–मुंबई–बचंभटाचें घर.

**पात्रें**–सुगुणी-पिलंभटाची बायको. ( बचंभटाची मुलगी. )

**सुगुणी**–(स्वतःशींच) हाय! हाय! केवढी मी कमी नशिबाची! कीं, आतां या जगांत माझें ह्मणून ह्मणण्याला व मला मदत करण्याला कुणिच नाहींना! प्रत्यक्ष भाऊ त्याला दिखील मी जड झालेंना!–(डोळे पुसून) नवरा मरून पुरे सहा महिने झाले नाहींत तोंच आपल्या हितासाठीं आईच्याही ह्मणण्यास न जुमानतां मला घरांतून हांकून द्यावीना! देवा! अशी फुटक्या नशीबाची जी मी त्या मला जल्मास तरी कशाला घातलेंस! लग्न होऊन पुरे दीड वरीस दिखील झालें नाहीं, तोंच ही आकाशाची कुऱ्हाड माझ्या डोक्यावर पडावी काय? हाय! हाय!! लहानपणीं ल-

ग्नाचें कुणी नांव काढलें कीं, केवढा आनंद होत असे व मनांतल्या मनांत लोकांच्या मुलींचे पाहिलेले सुख सोहाळे माझ्या डोळ्यांसमोर फिरून ह्याच प्रमाणें मीही मिरवेन असे अनेक विचार येऊन केवढा बरें आनंद होत असे? परंतु त्यावेळीं एक वेळ तरीं मनांत असें आलें होतें का कीं, लग्न झाल्यावर आपणाला असे दुःखाचे सोहाळे भोगावे लागणार आहेत ह्मणून? ज्यांच्याबरोबर मी नेहमीं खेळत असें, त्याच माझ्या मैत्रिणी आज कशा सुखानें नांदत आहेत. जर मी ह्यावेळीं त्यांच्या समोर जाऊन उभी राहिलें, तर त्याच माझ्या लहानपणीच्या जिवाच्या मैत्रिणी ह्मणून वाटतात त्या माझ्या अशा दुःखाच्या वेळीं घटकाभर थारा तरी करतील काय? छे! नांव कशाला हवें! कदाचित् ओळखणारही नाहींत. पैशावांचून सर्व फुकट आहे. आज ज्यांच्यापाशीं पैसा आहे अशा बहिणींकडे त्यांचे भाऊ ह्मणजे गुलामांप्रमाणें खपतात, त्यांचीं आर्जवें करतात; सारांश, बहिणीच्या पैशावर पोटभरून आनंद करतात. पण त्याच बहिणी जर उद्यां भावाच्या आंगावर पडल्या तर तेच भाऊ कधींही बहिणीची कींव करणार नाहींत. भाऊच कशाला? प्रत्यक्ष बापही करणार नाहीं. जर बाबांनीं माझ्या लग्नाच्यावेळीं आईचें ह्मणणें ऐकलें असतें तर हा प्रसंग मजवर कां आला असता, त्यावेळीं बाबांना पैशाची हांव पडली होती ह्मणूनच माझ्या जल्माचें मातेरें झालें. असें असूनही माझ्या अण्णाचे मनांत माझी दया

आली नाहींना? अरे! तुझ्यासाठीं बाबांनीं माझ्या जरा दिखील सुखाकडे लक्ष नपुरवितां मला विकून, जशी एखादी धोंड लोटतात तशी लोटून सर्वस्वीं तुझें कल्याण केलें. हें देखील तुझ्या मनांत आलें नाहींना! इतकेंच केवळ नाहीं तर वरीस पुरें झाल्याशिवाय लोकांत तोंड दाखविण्यास मला बाहेर काढूं नये ह्मणून आईनें केवढा उरस्फोड केला! पण सगळें फुकट. उलट एखादेवेळीं ती मला मदत करील ह्मणून प्रत्यक्ष आईलाही घरांतून काढून वेगळी करण्याची भीती घातलीस! देवा! आतां मी कुणाचा आसरा करूं. तुला देखील नाहींना माझी दया येत (असें ह्मणून रडूं लागते.) (डोळे पुसून) नशिबीं आलें तें भोगलेंच पाहिजे. शेजारच्या विठाबाईला दया येऊन तिनें माझी कशीतरी चार महिने आपलेकडे सोई करून पुढें खाणावळ किंवा कुठें स्वयंपाकला बाई वगैरे ठेऊन देऊन धंद्याला लावण्याचें कबूल केलें आहे. तेव्हां तिच्या कडेस जाऊन पहावें.

**अंक ३ समाप्त.**





# अंक चवथा.

## प्रवेश १ ला.

**स्थळ**–पुणें–विनायकरावांच्या बंगल्यांतील खोली.

**पात्रें**–विनायकराव आणि त्याची बायको सुशीला.

**विनायकराव**–( मेजाशेजारीं खुर्चीवर बसले असतां दुःखाचा उश्वास टाकून स्वतःशींच ) एकंदरींत मामांच्या दुराग्रही स्वभावाचा मोबदला त्यांस मिळत चालला आहे. जरी ते मजवर रागावले आहेत तरी, आपलें कर्तव्य आपण बजावलेंच पाहिजे; ह्मणून बारकाईनें शोध करून व मनाचा हिय्या करून यमूची दुःखकारक स्थिति पहाण्यास गेलों. हर हर, काय ते मूर्ख लोक, प्रत्यक्ष तिचा मी आतेभाऊ असतांही मला तिची भेट घेऊंदेत नव्हते. परंतु ठीक झालें कीं, चार चांगल्या गोष्टींवर समजले. हर हर, तिची ती दुःखकारक स्थिति पाहून व ऐकून माझ्या हृदयांत केवढें भडभडून आलें ह्मणून सांगूं? पण तिला तें बाहेर न दाखवितां, आलेला दुःखाचा उमाळा मी मोठ्या धैर्यानें तसाच गिळला. अहा! हा! तिचे ते सजल नेत्र, व ती दीन मुद्रा, अद्याप माझ्या डोळ्यांसमोर मूर्तिमंत दिसत आहे. अरे! रे, जिचें मुख नेहमीं आनंदानें प्रफुल्लित असावयाचें

तेंच आतां कोमेजलेल्या फुलाप्रमाणें निस्तेज दिसावें व अशी तिची दुःखद स्थिति पाहण्याचें आज आमच्या कपाळीं यावें ना! खरोखर ह्या सगळ्या चुका आमच्या लोकांच्या आहेत. लहानपणीं लग्नें केल्यापासून वारंवार जे दुष्परिणाम घडून येतात ते पाहूनही आमच्या लोकांच्या डोक्यांत सुविचाराचें वारें कसें तें मुळींच शिरत नाहीं. हें मोठें आश्चर्य आहे. त्यांत आमच्या दुःखरूप पंकांत पडलेल्या दीन बालविधवांच्या शोचनीय स्थितीकडे लक्ष दिलें असतां, विचारी मनुष्यांचें अंतःकरण विदारल्यावांचून राहावयाचेंच नाहीं. खरोखर आमच्या मूर्खत्वाचीं फळें त्या अबलांस भोगावीं लागतात. महत्वाकांक्षा व अज्ञान ह्यांच्या पुढें तर त्यांस कांहींच दिसेनासें झालें आहे. आणि शास्त्रकारांनीं तर ब्राह्मणांचीं हृदयें ह्मणजे लोण्यापेक्षांही कोमल असें ह्मटलें आहे. तेव्हां जें अज्ञान त्यांच्यांत वसत आहे तें जाऊन ते आपल्या ब्रह्मत्वास योग्य ते आचार करूं लागतील तो सुदीन समजला पाहिजे. ( इतक्यांत सुशीला येते )

**सुशीला**—झालें का पत्र लिहून? मला तर बाई लिहून कळविण्याखेरीज दुसरी तोडच दिसत नाहीं. पत्रांत असें लिहावें कीं, जर आपण माझें न ऐकतां, यमूला सासरीं ठेवाल तर पुढें तिची काय दशा होईल हें माझ्यानें सांगवत नाहीं.

**विनायकराव**—काय? पत्र! हें बघ लिहून तयार ठेवलें आहे. ( असें ह्मणून सुशीलेचे हातांत देतो. )

**सुशीला**–[ पत्र वाचून ] यापेक्षां आणखीं तें काय लिहायचें?

**विनायकराव**–( पत्र बंद करून व वर पत्ता लिहून ) इतक्यानें जर त्यांची खात्री नच झाली, तर समक्ष भेट घेऊन पदरीं माप घातल्याशिवाय कधींच राहणार नाहीं. मग काय जें होणें असेल तें होईल. पण तिची ती दुःखकारक स्थिति नाहींच आतां माझ्यानें पाहवत!

( पडदा पडतो. )

---

# अंक चवथा.

---

## प्रवेश १ ला.

**स्थळ**—पुणें-यमुनेचें सासर-( आबासाहेब निमुळ्यांचें घर. )

**पात्रें**—यमुना, कृष्णशास्त्र्याची मुलगी, कुशी, दुर्गी, यमुनेच्या नणंदा व सावित्रीकाकू-यमुनेची सासू.

**यमुना**–( डाळतांदूळ निवडीत आहे इतक्यांत पडदा उघडतो. ) ( स्वतःशींच ) काल माझा विनूदादा इकडे कसाबरें आला? माझी स्थिति त्याला कळली तर नसेलना! कदाचित् माझा शोधसमाचार घेण्यासाठीं बाबांनीं तर नसेलना त्याला पत्र लिहिलें! ते इकडून मुंबईस गेल्याला, नाहीं नाहीं ह्मणतां, आज सहामहिन्यांवर दिवस होऊन

गेले. इतके दिवसांत माझ्या खऱ्या मायेचें मनुष्य कसेंतें मुळींच दिसलें नाहीं. काल दादाचें इकडे येणें माझ्या दैवानेंच झालें ह्मणायचें. त्यानें मला पहातांच त्याच्या मनाची कशी स्थिति झाली? त्याचे उरांत भडभडून येऊन कंठ दाटून आलासें दिसत होतें, मधून मधून बोलतांना त्याचा शब्द सुद्धां साफ निघत नसे. कांहींना कांहीं मिषानें आपल्या तोंडापाशीं एकसारखा रुमाल नेत होता. देवा! कोणत्याही मनुष्यानें माझी स्थिति पाहिली अथवा ऐकली, तर त्याला दया आल्यावांचून मुळींच राहवयाची नाहीं. पण ह्या माझ्या सासरच्या माणसांनां माझी कांहींच का दया येऊं नये? उजाडलें नाहीं तोंच लागलेंच एखादें कुभांड माझ्या मागें. त्या दिवशीं तांदुळांत डाळ व बारीक बारीक खडे एकत्र करून 'तूंच हें केलेंस' ह्मणून दुर्गावन्सांनीं ते पुनः निवडायला लाविले. असा नेहमीं त्रास देतात तो देतातच, शिवाय केव्हां केव्हां मारही खावा लागतो. पण मी त्यांला चकार शब्दानेंही दुखवीत नाहीं. तरी ह्मणे आह्मी इतक्या बोलतों त्याचें तुला कांहींच नाहीं. आह्माला आपली कुत्र्यासारखें भोंकत ठेवतेस. जर मी उलट जबाब करूं लागलें तर त्यांचा वडीलपणाचा मान तो काय राहणार? बरें कामाविषयीं ह्मटलें तर, मी माझेकडून कोणत्याच गोष्टींत आळस करीत नाहीं. असें असतां माझ्यामागें आहेच आपली किरकीर. आज पंधरवडा होत आला कुसावन्सें आणि दुर्गावन्सें आल्यापासून तर माझे

बाई पुरेच हाल होत आहेत. काल जेवतेवेळीं घरांतील सर्व पेले अडल्यामुळें, मी पुष्कळ शोधलें पण रिकामा पेला मिळाला नाहीं. एखादा घासून घ्यावा तर पान वाढलें आहे तें राखायला चाकर कुठले आणावे, ह्मणून जेवायला बसलें मात्र, तों झालेंच तोंड सुरू. पेला द्यायला विसरलें एवढ्यावरून भांडण धुमसून शिव्यागाळी करतां करतां, शेवटीं गंधाचें खोड माझ्या कपाळांत मारिलें, त्या योगानें पानांत रक्त पडून मला जेववेनासें झालें. व मी उठतें आहे तोंच "फार माजलीस" असें ह्मणून दोघींनीं मला लाथाबुक्यांनीं यथेच्छ मार दिला. [ रडूं लागते व कुशी प्रवेश करीते. ]

**कुशी**—तुला डाळ तांदूळ निवडायचे आहेत का सगळा दिवस रडत बसायचें आहे? रडून रडून आपणही रडलीस आणि दुसऱ्यांनाही रडवलेंस! काय पण बाईचा पायगुणतरी! कसा माझा सोन्यासारखा भाऊ होता. लग्न होऊन घरांत आली नाहीं तोंच झाला आपला पंडुरोगी! पांढऱ्यापायांची कुठली! हो, काल मेला कुठला ग बाऱ्या आणला होतास घरांत. नि ह्मणे तो माझा विनूदादा. कसलेंग चालविलें होतेंस त्याजवळ चऱ्हाट? जायचें आहे वाटतं कुणा एखाद्याचा हात धरून ( इतक्यांत दुर्गी येते )

**दुर्गी**—काय झालें ग ताई, काय झालें? या कपाळफुटकीनें कांहीं केलें वाटतें. आमच्या घरांत ही एक पिडाच आली आहे. दुसरं कांहीं नाहीं.

**कुशी**–अग काल तो मेला बाळ्या आला होताना! त्याजवळ मेलीनें कसलें चऱ्हाट लांबविलें होतें नकळे.

**दुर्गी**–तो मेला तसलाच आहे. मेल्याचे नांवाचा डंका चालला आहे सगळ्या गांवांत. कुणा जळल्या वकिलाच्या मुलीशीं-जिला कुणी करीतसुद्धां नव्हतें ति--च्याशीं-लगीन केलें आहे हो त्याणें, नि ह्मणे विधवा बायकांचीं पुन्हां लग्नें करावीं. अशा हजार तऱ्हा करणाऱ्या मंडळींतला आहे हो तो. त्या मेल्याला बाबांनीं कसं घरांत येऊं दिलें कोण जाणें.

**कुशी**–खरेंच बाई. या सटवीचा तरी कुणी नेम सांगावा? बाबांना सांगून एकदां त्या गोष्टीचा बंदोबस्त करविला पाहिजे.

**दुर्गी**–हो. तशाच त्या शेजारच्या गोदीबरोबर कसल्याग एवढ्या हितगुजाच्या गोष्टी करीत होतीस? आह्मीं नणंदा तुला जाच करतों असेंच कीं नाहीं? तुला वाटत असेल आह्माला जसें समजतच नाहीं. आई आपली तुझे सगळे अपराध पोटांत घालते ह्मणून तुझे ढंग फार वाढत चालले आहेत.

**कुशी**–[ रागानें पुढें होऊन व यमूला ढकलून ] तसंच त्या उमाकाकूजवळ कायग बोलत बसली होतीस? एवढ्यांतच माहेरीं जायची हौस आली आहे वाटतें. आहे का कांहीं नवरा मेल्याचं दुःख, कुठून असणार?

**यमुना**—वन्सं, मी बोलतें आहें त्याचा राग जर न आणाल तर मी बोलतें. मघांपासून तुह्मी एकेक नवें नवें काढून बोलत अहांत. मी कुणाला तुमच्या खोट्यानाट्या चहाड्या सांगितल्या? उमाकाकूला तर मी उभ्या पंधरा दिवसांत बघितलं सुद्धां नाहीं. उजाडल्यापासून एकसारखें घालून पाडून बोलतांच अहांत. सासूबाई देखील माझें ऐकत नाहीं. इतकी तुमच्याशीं अदावत ती कोणती केली? मी सगळ्यांच्याच डोळ्यांत जशी केर होऊन गेलें आहें! माझें नशीब फिरलें हें मी माझ्या हातांनीं का करून घेतलें. मी माझ्या आतेभावाला दादा असें देखील नये का ह्मणूं? असा मी तुमचा अपराध तरी कोणता केला आहे? आधींच मेलेली नी त्यांत तिला मारणें हें तुह्मांला शोभतें तरी का! ( रडूं लागते. )

**कुशी**—दुर्गे, बघ कशी चुणचुण बोलते आहे ती! शास्त्र्यांची मुलगी झालीस ह्मणून आह्मांला शास्त्रार्थ शिकविते आहेस वाटतं? आह्मीं नाहीं हो ऐकायच्या हे तुझे शास्त्रार्थ (तोंड वेगाडून) 'आधींच मेलेली नी त्यांत तिला मारणें,' असं बोलून आह्मांला भेवडावतेस वाटतं! ( असें ह्मणून तिचे गालगुचे घेते )

**दुर्गा**—आईन ग तुझें काय केलें? सकाळ उजाडत नाहीं तोंच आपलें काळें तोंड घेऊन पुढें आपली दत्त उभीच! ( यमुनेचे डोक्यास हिसका मारून ) तिनें ग कशाला सकाळीं उठून हें असें तुझें तोंड पहावें! जळला मेलीचा मुखडा

तो. अजून कशाला असाच ठेविला आहे कोणजाणें. शेजार पाजारच्या बायकांचें हसें झालें आहे मात्र!

**कुशी**–तसेंच सकाळीं उठल्याबरोबर ह्या जळलीचें तोंड बघितलें ह्मणूनच आज मजवर बाबांनीं राग केला नाहीं तर हँ ह्मणून मला बोलायचें नाहींत. हो बरी आठवण झाली. मघां माझ्या दत्तूला आंगणांत नाग पाडलेंस? अवदसे तुला लेंकराची देखील दया नाहीं ना? शिंदळीला पोराची का आशा असते?

**यमुना**–( भयचकीत होऊन ) वन्सं मी कधीं बरं दत्तूला आंगणांत पाडलें? उलटें त्यास न्हांऊंमाखू घालून पाळ-ण्यात निजविलें. तरी तो उगा राहीना ह्मणून सासूबाईनी घेतला नी तुह्मीं ह्मणतां पाडलास ह्मणून. तेव्हां माझें नशी-बच कीं नाहीं?

**कुशी**–( रागावून ) मला का ग तूं खोट्यांत पाडते आ-हेस! मी तुझी नणंद ना! ह्याचा तरी कांहीं मान! ( केंस धरून मारते )

**द्वा**–असेंच हवें या अवदसेला! मार ताई, मार मे-लीच्या कमरेंत लाथ! ( असें ह्मणून मारतात इतक्यांत सावि-त्रीकाकू येते. )

**सावित्रीकाकू**–( रागानें ) अग तुह्मांला झालें आहे तरी काय? उजाडलें कीं आपलीं भांडणें, तंटे नि मारामाऱ्या हें आहे तरी काय?

**कुशी व दुर्गी**—आई शर्थ झाली तुझ्या सुनेपुढें. आह्मी ह्मणजे तिच्या हाडवैरिणीच.

**सावित्रीकाकू**—सटवे! (यमुनेचे दोन्ही हात धरून व तोंडांत लगावून) दोन दिवस माझ्या पोरी घरीं आल्या आहेत त्या देखील तुझ्यानें पहावत नाहींना? फुटले तुझे डोळे एकदांचे ते. तूं काय समजली आहेस मनांत? थांब देतें आहे चांगले डाग! ह्मणजे आपोआप येशील वळणीस. (तिच्या हाताला ओढून) चल अवदसे चल, आतां कां? अग ओढा हिला नि चला घेवून स्वयंपाघरांत आणि ठेवा पोहऱ्याचे दोरानीं करकचून बांधून, मी उलथणें तापवून आणतें. (तिला दुर्गी व कुशी ओढून नेतात)

**यमुना**—(दीनस्वरानें) नको हो नको सासूबाई! मी तुमची अनाथ सून आहें. जर माझेकडून अपराध झाले असतील तर देव मला तुमच्या अगोदर शिक्षा करील. मी तुमच्या पायां पडतें. नाक घासतें. वन्सं नकोहो नको. नाहींच का तुह्मांला माझी दया येत? माझे अपराध असतील ते क्षमा करा पण मला भाजूं नका. देवा आतां मला सोडीव एकदांचें!

**तिघीजणी**—सोडून सोडून तर चढलीस माथ्यावर. आतां कोण येतें आहे सोडवायला तें आह्मांला पाहूं दे.

(आंत नेतात व पडद्याचे आंत गलबला होतो.)

---

# अंक चवथा.

## प्रवेश ३ रा.

**स्थळ**—पुणें-सखारामभटाचें घर.

**पात्रें**—सखारामभट ( यमूच्या सासरचा उपाध्या. )

**सखारामभट**--( फिरतां फिरतां स्वतःशींच )आज महिना दीड महिना होत आला, पितृपक्ष गेल्यापासून द्वादशीचे शिध्याखेरीज उत्पन्न कसें तें मुळींच झालें नाहीं. आबासाहेब निमूळत्यांचा मुलगा वारल्याला, आज निदान ( आठवलेंसें करून ) ज्येष्ठ शुद्ध पंचमी ( महिने मोजून ) चालू मार्गशीर्ष सातवा महिना चालला आहे. आणि त्यांचे घरांत सुनेलाही बराच जाच होत असतो. मागें एक दोन वेळां गोष्ट काढली होती. दिवाळीच्या अडचणीमुळें राहिलें. कदाचित् बापाची एकुलती एक असल्यामुळें बोलावूं येण्याचाही विशेष संभव आहे. तेव्हां जितकी जलदी करवेल, तितकी केलीच पाहिजे. हो. परवां शनिवारीं आयतीच पर्वणीही आली आहे, तेव्हां घाट साधलाच पाहिजे. आणि तिच्या सासूनेंही परवां गोष्ट काढलीच होती कीं हिला आतां सोंवळी करायची ह्मणून. आणि त्यांच्या घरांत सोंवळ्या ओंवळ्याचेंही बंड बरेंच आहे. यामुळें खुद्द यजमान आबासाहेबांचाही नकार पडावयाचा नाहींच. पण, अलीकडे तो नागूभट मजपेक्षां बराच विद्वान् व आर्जवी असल्यामुळें त्याचें बंड ह्यांच्या घरांत

फारच माजलें आहे. व मी जुना उपाध्या असूनही मधल्यामध्येंच लडबडत राहिलों आहें. तेव्हां जितकें लौकर होईल तितकें केलेंच पाहिजे. नाहीं तर तो अगोदरच घाट घालून लाट मारून स्वस्थ बसायचा. जर हा बेत साधला तर पुढें येणाऱ्या लगनसराईपर्यंत पोटाची काळजी करावी लागणार नाहीं. आतांच गेलों असतों पण दिव्यांत तेल जाळीत बसण्यापेक्षां, उद्यां लौकरच स्नानसंध्या उरकून गेलेलें बरें.

( असें ह्मणून जातो. )

---

# अंक ४ था.

## प्रवेश ४ था.

**स्थळ**–पुणें–रस्ता.

**पात्रें**–कृष्णशास्त्री.

**कृष्णशास्त्री**–( स्वतःशींच ) विनायकाच्या पत्राची प्रचिती पाहण्यासाठीं मुद्दाम येथें आलों. बाकी खरें ह्मटलें तर तिला सासरचा जाच होताच आणि आतां तर विशेष होत असेल यांत शंका नाहीं. खरोखर आमच्या बायकांची ही मोठी चूक आहे कीं, सून आणि स्वतःची मुलगी ह्यांत भेद मानतात. अलीकडे माझीच ग्रहदशा फिरली आहे. जितकें ह्मणून चांगलें करावयास जावें, तितकें आंगावर आल्यावांचून राहतच नाहीं. अस्तु. तिला पहिल्यापासून

थोडाबहुत जाच असेच अशी जरी माझ्या मनाची खात्री आहे, तरी केवळ विनायकाच्या लिहिण्याप्रमाणेंच स्थिति असेल असें मला वाटत नाहीं. ह्मणून लक्ष्मणरावांकडेस जाऊन ह्या गोष्टीची चौकशी करावी. ह्मणजे सर्व कांहीं कळून येईल.

( असें ह्मणून निघून जातो. )

---

# अंक चवथा.

## प्रवेश ९ वा.

**स्थळ**—पुणें–यमूचें सासर– ( आबासाहेब निमुळल्यांचें घर )

**पात्रें**—यमुना, दुर्गी, कुशी, सावित्रीकाकू, सखारामभट, कृष्णशास्त्री, विनायकराव.—

**सावित्रीकाकू**–( रागानें ) अग तुला सांगावें तरी कितीदां ? नुकतीच परवांच्या दिवशीं तूं अशाशिवाय वठणीस यायची नाहींस ह्मणून चांगले डागसुद्धां दिले. पण तुझी खोड ह्मणून कशीती जात नाहीं. हजारदां सांगितलें कीं तुला सोंवळी करीपर्यंत पाण्याबिण्याला शिवत जाऊं नकोस, तरी दुर्गी पाणी आणीत असतां तिला धक्का देऊन चालती झालीस. तसेंच दररोज सांगत असतें कीं, तूं एव्हांशींच देवघरांत जात जाऊं नकोस तरी तुझें आपलें आहे तें आहेच. जेव्हां आपल्या पायगुणानें सगळ्यांना रडविलेंस त्याच घटकेस माझ्या मनांत आलें होतें कीं, टा-

कावी जळलीला एकदांची सोंवळी करून पण, तिकडून न्याह्याला पुढचे पुढें दयेचा मोठेपणा दाखविण्यासाठीं कीं, कोण जाणे काय आलें होतें मनांत तें, त्यावेळीं मोडा घातला, नाहींतर अद्यापपर्यंत ठेवली असती का तुला अशीच? तेव्हांच माझें ह्मणणें मी खरें केलें असतें.

**दुर्गी**—मघां किं नाहीं ग आई सखारामभटजींस एकादष्णी करतां पाणी पाहिजे होतें ह्मणून तांब्या घेऊन विहिरीवर गेलें मात्र, तोंच हिचें आपलें पुरुषासारखें आंग धुणें सुरू झालें. तेव्हां मी तीनदां बजावून सांगितलें कीं, वैहिनी देवपुजेला पाणी न्यायचें आहे, शिंतोडे उडवूं नकोस. पण माझें ऐकतें आहे कोण? तांब्या तीनदां घांसायला नी भरायला लावला. आणि तसेंच मी नी ताई घरांत पाणी भरीत असतां धक्की देऊन शिवलीच आपली!

**कुशी**—आई जर तूं या अवदसेला घरांत ठेवशील तर आह्मांला आमच्या सासरीं पोंहचीव. पुरे झालें बाई आतां माहेरचें सुख. हा दर दिवशींचा त्रास नाहींच बाई आमच्यानें निघत.

**यमुना**—वन्सं जर मी तुह्मांला त्रास देत असेन तर देव त्याचा सूड उगविल्यावांचून कधींही राहणार नाहीं. नी मघां तुह्मांला मी कधीं शिवलें? तुह्मी बोलतां अहांत त्यास माझा नाइलाज आहे.

**सावित्रीकाकू**—( यमूच्या अंगावर धांवत जाऊन व तिला मारून ) गधडे! माझ्या पोरींवर बालंट घालतेस? शर्थ

झाली बाई तुझ्यापुढें! मला नाहीं हो असले चाळे आवडणार. काय समजली आहेस मनांत? धरीन नी चेंचीन लगेच [ दांत ओंठ चावून ] केलीन् नांवासारखी करणी अवदसेन नि घातलन् नेऊन काळसर्पाकरवीं यमुनेच्या डोहांत नवऱ्याला! ( आंत जाते व कृष्णशास्त्री प्रवेश करतात )

**कृष्णशास्त्री**—अरे, मी अगदीं यमूच्या घराजवळ येऊन पोंहोंचलों. ह्याच्या पुढलें घर लक्ष्मणरावांचें. ( आंत डोकावून ) घरांत पुरुष मंडळी तर कोणी दिसत नाहीं. परंतु बायकांचें मात्र उच्चस्वर ऐकूं येतात. तेव्हां या समोरच्या खिडकींतून पाहूं तर खरें. आंत काय चाललें आहे तें. ( असें ह्मणून पुढें जाऊन उभा रहातो. )

**यमूना**—( स्वतःशींच ) बोला, मारा, वाटेल तें करा, देव मला एकदांची सोडवो ह्मणजे झालें. ( इतक्यांत कुशी व दुर्गी धांवत येऊन तिला मारतात. )

**कृष्णशास्त्री**—अरे ही तर माझी यमुना! अहा हा बाळे काय ही तुझी स्थिति ( यमूला मारतात तें पाहून ) अरे! हें काय?

**दुर्गी**—कायग तोंडानें पुटपुटत होतीस, आह्मांला शिव्या का देते आहेस? करंटे! तुझें एक कपाळ फुटलें ह्मणून आह्मांला का आशीर्वाद देते आहेस? ( असें ह्मणून यमूनेस मारते इतक्यांत सखारामभट येतो. )

**सखारामभट**—( स्वतःशींच ) वः संधि बरीक उत्तम आली खरी. ( दुर्गीला व यमूला एके बाजूस करून आंत

घालवितो ) सावित्रीकाकू, अहो सावित्रीकाकू, इकडे या आधीं. पाहिलात का इकडे काय गोंधळ चालला आहे तो?

**सावित्रीकाकू**–( रागानें धांवत येऊन व दोघींस एका बाजूस करून व यमूच्या तोंडांत मारून ) या कपाळ फुटकीनें मला पुरे पुरे केलें आहे. मघांपासून शिवाशिवीचें भांडण चाललें आहे. ( तिघीजणी आंत जातात )

**सखारामभट**–( स्वतःशींच आनंदानें ) वः बोलण्याचा ओघही अगदीं उत्तम जुळून आला. घराहून निघतानां पूर्णकुंभ घेऊन सवाशीण पुढें आली त्याचेंच हें फळ! ( उघड ) मग हें भांडणाचें मूळ घरांत ठेवलें आहे तरी कशाला! घटकेंत ह्मणे "ह्याला शिवलीस, त्याला शिवलीस." असें हें रोज काढणार तरी किती? आणि तशांत धर्मालाही व्यत्यय! आतांशा गावांत अमक्या अमक्यांच्या घरांत ह्या कारणानें सोंवळ्या ओंवळ्याचा धरबंध मुळींच नाहीं ह्मणून उघड उघड बोलूं लागले आहेत. तशांत आतां सणाचाही आड राहिला नाहीं व तिच्या कपाळींही तेंच आलें आहे. आणि त्यांत परवां शनिवारीं पर्वणीही आहे तेव्हां आणावी एकदांची सोंवळी करून ह्मणजे संपली ही दगदग तुमच्या मागची.

**कृष्णशास्त्री**–हर! हर! काय हा गहजब!

**सावित्रीकाकू**–यासाठींच तर तिकडून नागूभटजींना सांगणें झालें आहे कीं न्या शनिवारीं ह्मणून.

**सखारामभट**–( मध्यमेवर तर्जनी आपटून स्वतःशींच )–

च्च्! शेवटीं साधलेंच गुलामानें. एकंदरींत माझें नशीबच कमी. [ असें ह्मणून आंत जातो. व पुनः गडबड सुरू होते ]

**कृष्णशास्त्री**–[ कान देऊन ] हूं. झाली सुरवात, आतां तिचा प्राण घेतल्यावांचून त्यांची शांतताच होणार नाहीं. काय हीं अमानुष कृत्यें!

( दुसरा पडदा उघडतो. )

**कुशी**–[ यमूनेस खालीं पाडून व तिच्या झिंगट्या ओढून ] कर आतां, केवढ्या गमजा करते आहेस त्या! ( असें ह्मणून मारते. )

**दुर्गी**–( लाथा बुक्या मारून ) ताई ही अशानें का वठणीस यायची आहे? परवांचे दिवशीं आईनें केलेली विद्याच केली पाहिजे. थांब, मी आणतें आहें. [जाऊं लागते]

**यमूना**–देवा, नारायणा, सोडीव रे सोडीव मला आतां! आई! आई! नका हो नका वन्सं मला डागूं! मी तुमच्या पायां पडतें. आई! आई! आई!

**कृष्णशास्त्री**–हर! हर! काय हें? आतां नाहींच माझ्यानें हें पहावत. काय यमस्वरूपी माणसें तरी! ( आंत जातो, व सावित्रीकाकू प्रवेश करिते. )

**सावित्रीकाकू**–( रागानें दांत ओंठ चावून ) जुंपलेंच पुन्हां! या सटवीनें तर पुरे पुरे केलें आहे. एकदांची मरती तरी बरें होतें. ( असें ह्मणून यमूनेला मारते. इतक्यांत कृष्णशास्त्री धांवत धांवत प्रवेश करतात. )

**कृष्णशास्त्री**–शिव? शिव? काय ही निष्ठुरता! बाळे यमूने, तुझी ही अशी दशा माझ्या डोळ्यांनीं पाहावेल

तरी कशी? (जवळ जाऊन) अहो, हें तुह्मी मांडलें आहे तरी काय? तिचा जीव घेणार कीं, करणार तरी काय? (असें ह्मणून यमूनेस उचलतो व सावित्रीकाकू दचकून मागें होते.)

**सावित्रीकाकू**–[न ओळखतां] कोण तुह्मी· परकी? एकदम–(ओळखून) पहा आमच्या घरांत काय धिंगाणे चालले आहेत ते! पुरे पुरे केलें आहे बाई!

**कृष्णशास्त्री**–(यमूनेला पोटाशीं धरून बाहेर येतो इतक्यांत पडद्यांतून) आबासाहेब आहेत का घरांत?

**सावित्रीकाकू**–मंडईत जायचें झालें आहे. बसा अम्मळ. (इतक्यांत विनायकराव बाहेर येतो त्यास पाहून) (स्वतःशींच) हो, हाच मेला त्या दिवशीं आला होता, ह्याचेंच सगळें हें काम.

**कृष्णशास्त्री**–(यमूनेसह बाहेर येतअसतां, विनायकरावास बघून) (स्वतःशींच) खरी माया ती हीच! नाहीं तर काय जरूर होती त्याला? (उघड) बा विनायका! जर तूं मला पत्र पाठविलें नसतेंस (गहिंवरून) तर माझी यमूना पुनः मला भेटली नसती.

**विनायकराव**–(स्वतःशींच) वः कार्यभाग उत्तम साधला. (उघड.) तुह्मी इकडेस आल्याची बातमी कळल्यामुळें मी लागलाच इकडे आलों. असो. झाल्या गोष्टीला इलाज नाहीं. मला वाटतें हिला आतां इकडे ठेवण्यापेक्षां समागमें न्यावी हेंच योग्य.

**कृष्णशास्त्री**—मला तर आतां कांहींच सुचेनासें झालें आहे. तुला वाटेल तसें कर! आतां मला त्यांचें मुखावलोकनही कर्तव्य नाहीं. आणि मी हयात आहें तोंपर्यंत माझ्या यमूला देखील त्यांच्या घराचा उमरा चढूं देणार नाहीं.

**विनायकराव**—माझेंही हेंच ह्मणणें आहे. आबासाहेब येईपर्यंत चला तुळशीबागेंत आपण जाऊन बसूं. ते आले कीं, यमूला मी घेऊन येईन. (यमूनेस) आह्मीं आतां येतों तोंपर्यंत काय जें तुझें घ्यावयाचें असेल तें घेऊन तयार अस.

(पडदा पडतो.)

# अंक चवथा.

## प्रवेश ६ वा.

**स्थळ**—पुणें-रस्ता.

**पात्रें**—सखारामभट, गणून्हावी, सदून्हावी, विठून्हावी व रस्त्यांतून जाणारा एक गृहस्थ.

**सखारामभट**—(मोठ्या जलदीनें स्वत:शींच) त्या दिवशींचा सगळाच बेत फसला. एका दिवसासाठीं सगळी घाण झाली; नाहीं तर त्या नागूभटाच्या हातावर हं, हं, ह्मणतां तुरी दिल्या असत्या. जरी आबासाहेबांनीं त्यास सांगितलें होतें, तरी मी समोर झाल्यावर त्यांच्यानें नाहीं असें कधींही ह्मणवलें नसतें. एकंदरींत आह्मां भिक्षुकांची

नशीबेंच कमी! ( इकडे तिकडे बघितलेंसें करून ) अरे! मी तर अगदीं बुधवाराजवळ येऊन ठेपलों. पण हारे कुठें इकडे गणून्हावडा! याच बाजूकडे तोंड करून जावें, नाहीं तर आतांच विचारीत सुटेल परवांची कबुलात! हे न्हावी ह्मणजे पहिले प्रतीचे हलकट. ( असें ह्मणून पुढें जाऊं लागतो. )

**गणून्हावी**–( सदून्हाव्यास ) त्ये सखारामभटानं सांगितलं व्हतं कीं, माज्या च्यार हजामती मुफत कर ह्मंजी आबासायबाच सुनेस्नी संवली करायचं काम तुलाच दिईन. पन नुकतच आयकलं कीं, त्येचा त्यो व्येत फसला ह्मंगुन्शानीं.

**सदू**–गनबा! कसं त्ये वंगाळ काम करता कुनास्नी ठावं! न्हायी पोट भरल तर उपाशी र्‍हावुं. भीकबी मागुं पन् नगच त्ये आह्मास्नी वंगाल काम! त्ये बामुनच करु जानत्याती!

**गणू**–अर सदबा! त्यो बग इकुंडच येतुया! थांबा की जरा गम्मत करूं! (सखाराम भटाजवळ जाऊन ) राम राम भटजीह्माराज! कस काय हाये?

**सखारामभट**–( स्वतःशींच ) च् च्! गाठलें गुलामानें अरे! लांब हो, लांब हो, शिवशील एखादा! मी स्नान केलेला आहें हें नाहीं का तुला कळत? रस्त्यांतच कां उभा राहतोस लांब हो जरा.

**गणू**–दम कुनास्नी भरताया राव! त्ये दिसाचा काम कुट हाये? न्हायीतर टाका माज च्यार आन्याच पैस!

**सखारामभट**–रस्त्यांत रे काय आहे पैशांचें? घरीं ये ह्मणजे देतों तुला हवे तेवढे पैसे!

**गणू**–अवत्र! ठावा हाये कित्का पैक्याचा ज्वोर हाये तो! ह्मनुनच दिवाळीपुन ह्मंगत व्हतां कि माज्या च्यार हजामती मुफत कर ह्मजी त्ये आत्रासात्र निजुळत्याच सुनेस्नी संवली करायचकाम खात्रीन तुलाच घेईन ह्मंतुनशानी! असल वंगाळ काम करता ह्मनूनशानीच बामुन भीक मागत्याती!

**सखारामभट**–अरे पण ह्या भर रस्त्यांत काय हें? घरीं ये आणि बोल काय बोलायचें असेल तें.

**सदू**–बगा राव, तुमच भटजीह्माराज कस ब्वोलत्याती त्ये! अव भटजीह्माराज, आह्मास्नी तरी द्या एकाद काम लावूनशानी. तुमच्या घरांतल्या संमद्याच्या बगा मी मुपत हजामती करीन.

**विठू**–[फडका झाडीत येतो] का गनबा? ह्येच का तुमच भटजीह्माराज! आक्सी लई हुश्यार! [सखाराम भटास] काव भटजीह्माराज बायकाच क्येस काढल आन् आक्शी कुरुप क्येल्या ह्मजी त्या वंगाळ काम करनार न्हायीत व्हय? काय पुन वंगाळ श्येस्त्र! आमास्नीबी ब्वोडकीची डवोई करायाची ह्मजी इक्त वंगाळ लागत कि पुसूच नका! आन्

तुमी बामुन आसुन्शेनी प्पोटाची श्येस्त्र घेउन्शानीं बसल्याती. इकुद्या पोरगीस्नी ज्येवरुक्तीं संवळी करत्याती त्ये वखतची संमदी तरा बगुनशानी कमाबास्नी बी दया यइल पन तुमा बामनास्नी त्येच कायीच न्हायी. ह्येंचा ह्योच धंदा. आज ह्येला सांगत्याती कि माज्या च्यार हजामती मुपत कर म्हजी फलान्याच्या बायकोस्नी सवळी करायाच काम तुलाच दिईन. उंद्या त्येला सांगत्याती. आक्शी आशीच वंगाळ बूद. त्यो नागूभटबी माला ह्येंच म्हनात हुता कि आबासायबाच्या घराच्या न्हाव्यास्नी न्हायी घेता खात्रीन तुलाच दिइन. पन माज सा आन्याच पैस झाल हुत. त्ये स्वोड, पन मी कसला राव! त्यास्नी म्हनालों किं त्ये काम व्हयील तवा बगू. आस ब्वोलून्शीं घ्येतलच बगा. आक्शी आसच वंगाळ. अव आमी यक तर न्हावी, आन् त्यामंदी ब्वोलून चालून परक, आस आसुन्शानीं तुह्मी आपल्ये बायकुची डवोई आमच हाती घ्येवी होय? लईच वंगाळ काम.

( जमलेल्या तमासगिरांपैकीं एक गृहस्थ पुढें होऊन )

**गृहस्थ**—शिव शिव, किती हें तुमचें निंद्यकृत्य! हे नीच जातीचे असुनही ह्यांच्या मनांत सदसद्विचार येतात. परंतु तुह्मी यःकिंचित् लाभ व महत्वाकांक्षेनें, शास्त्रांत नसतांही, थोतांडी ग्रंथ रचून त्यांत विधवास्त्रियांचें वपन करण्याविषयींचे श्लोक रचून घातले अहांत. स्त्रिया ह्मणजे

काय? व त्यांची योग्यता आमच्या शास्त्रांत कशी व किती वर्णिली आहे याकडे लक्ष न देतां, त्यांस अशिक्षित ठेवून धर्मभोळ्या बनवितां. स्त्रियेचा नवरा मेला असतां, तिच्या डोकीचे केंश काढवून तिच्या मृत नवऱ्यास कोणतें परमार्थ सुख होणार? व इतर धर्मांतील लोक असें करीत नाहींत ह्मणून त्यांच्या नवऱ्यांस ईश्वर नरकांत टाकीत असेल काय? 'स्त्रियांचें वपन करणें' हा विचार मनांत आला कीं, ज्याच्यावर प्रसंग गुदरले आहेत अथवा ज्याला सत्यता जाणण्याची शक्ति आहे, त्याच्या मनांत हा विचार येतांच त्याचें हृदय विदारण झाल्यावांचून कधींही राहणार नाहीं. शिव शिव! किती मूर्खपणा हा! कीं, ज्या स्त्रीचें वपन झालें आहे तिला आपला जन्मदाता जो बाप, त्यालाही तोंड दाखविण्यास कांहीं कालपर्यंत लज्जा उत्पन्न होते. परंतु नाइलाजानें तिला ती सर्व लज्जा गुंडाळून ठेवणें भाग पडतें. बरें इतकें होऊनही वपनानें त्यांची कामवासना कमी न होतां त्या उलट्या अमर्याद, निर्भीड व निःशंक बनून राहतात. तेव्हां ज्यासाठीं ह्मणून हा दुःखकारक, वाईट, तसाच हास्यकारक असा वपनविधि करावयाचा त्याचें मूलतत्व एका बाजूस राहून उलट त्यांच्या हातून अनेक कुकर्में झालेलीं विशेष दृष्टीस पडतात! आतां तुह्मीं असें ह्मणाल कीं, 'विधवा स्त्रियांचें वपन करवून त्यांस कुरूप करून त्यांजकडून कडक

व्रतें उपोषणें करविलीं म्हणजे त्यांची कामवासना कमी होऊन त्या सदाचरणी होतील; परंतु ही कल्पना सर्वथैव चुकीची आहे. कारण, ईश्वरनिर्मित कामवासनादि विकारांस आपण बळें होऊन किती जरी आडकाठी आणली, तरी ते कमी न होतां उलट जास्तच होऊं शकतील! ह्या साठीं असले वाईट प्रकार न करतां, त्यांस विद्या व खरें धर्मशिक्षण देत जावें म्हणजे आपोआप त्या सदाचरणी बनतील. व ज्यांस असें राहण्याची इच्छा नसेल, त्यांस शास्त्राप्रमाणें पुनर्विवाह करण्याची मोकळीक द्यावी. हर! हर! काय हा तुमचा अविचार. आपल्या स्वार्थासाठीं अज्ञान स्त्रीपुरुषांचे मनावर विलक्षण धर्मभीति घालून, पैसे काढतां. हें केवढें दुष्कर्म! खरोखर असल्या ढोंगी ब्राह्मणांच्या आपमतलबी शास्त्रग्रंथांवर विश्वास ठेवून आमचे मूर्ख लोक व विशेषतः आर्यभगिनी व्यर्थ फसतात!

**सखारामभट**—( हातजोडून ) क्षमा करा. आपण जें भाषण केलेंत तें अक्षरशः खरें असून केवळ द्रव्यसंपादनाच्याच हेतूनें आमच्या वडिलांनीं, असलीं पुस्तकें व असल्या चाली रीति प्रचलित केल्या आहेत; किं जेणेंकरून शूद्रादि लोकांत आपलें वर्चस्व राहून द्रव्यसंपादन करण्यास मिळावें. आतां, हे प्रकार पुष्कळ दिवस चालत असल्यामुळें, खऱ्या शास्त्राप्रमाणेंच ब्राह्मणस्त्रीपुरुषसमुदायांच्याही हाडींमासीं खिळल्याच्या योगानें आमचें आयतेंच काम

होतें. त्यांतूनही आपल्या लोकांतील स्त्रिया अशिक्षित असल्यामुळें, त्यांच्या भोळ्या मनावर आमच्या आपमतलबी शास्त्राचा विश्वास विशेष बसतो. व आह्मांस द्रव्यप्राप्ति होते. बाकी खरें ह्मणाल तर, स्त्रियांचें वपन करणें हें मोठें घोर कृत्य असून त्यांची मर्यादा व भीड ह्यांस पाल-विण्यास तें कारण होतें, परंतु यापासून आह्मांस द्रव्यप्राप्ति होण्याचा संभव असल्यामुळें, ही चाल चालू राहण्याचा आह्मी यत्न करीत असतों.

**विठू**–अस जर तुमास्नी समजायास्नी लागलं हाये तर ह्याच स्वोडून आन् दुसऱ्या बामनासवी आक्शी आसाच ब्वोद करीत जा. जशी तुमास्नी ह्ये कामाची पैदासी हाये, तसी आमास्नीबी हायेच. पन घ्योवाशपत एकादी ब्वोडकीची डवोई करायाची ह्मजी आमास्नी लईच खराब लागत बगा! पन काय करनार? तुमची चालच हाये तिकड नाविलाज हाये आमचा!

**सदू**–अव आमच्या संमद जमातीन ब्वेतच क्येला व्हता कीं, जिक्ता न्हावी ह्मनून हाये, तिक्त्यानं ब्वोड-कीची डवोई ह्मनुन न्हाईच करायची. पन तुमच बामन कसल वंगाळ! आलच आडव अन् काय आमास्नी! कायीक तसबी ह्मंनाल की तुमी न्हायी क्येलीत तर आमी करू आमी. असल पगा आक्शी वंगाळ तुम्च बामुन.

**सखारामभट**—आजपासून तर हाच निश्चय कीं, असल्या घाणेरड्या भिक्षुकींत स्वतः न पडतां, साधेल तितकें करून दुसऱ्यासही पडूं द्यायचें नाहीं. असो. झालें तें झालें. त्याची आतां क्षमा करा.

**सर्व**—ठीक आहे. याप्रमाणेंच चाला. म्हणजे झालें.

(पडदा पडतो)

**अंक ४ समाप्त.**

---





# अंक पांचवा.

## प्रवेश १ ला.

**स्थळ**–मुंबई, मुगभाटचा रस्ता.

**पात्रें**–पोलीस जमादार.

**जमादार**–[ स्वतःशींच ] आज कचेरींत आल्याबरोबर साहेबांनीं हा अर्ज माझ्या स्वाधीन करून हुकूम केला कीं, 'अर्जांत नमूद केलेली बाई ही एकटीच असून तिचा प्रतिपाळ करणारें कोणीच नसल्यामुळें, तिला अनाथ गृहांत नेऊन ठेवावी. ह्मणजे बालहत्या सहज टळेल. याकरतां ह्या गोष्टीचा नीट तपासकरून काय तें कळवावें.' बरें पण, अर्जांत काय लिहिलें आहे तें पहिल्यानें वाचलें पाहिजे. ( वाचतो )

'मुंबई ता. २९ मे सन १८९४'

मेहेरबान पोलीस कमीशनर साहेब बहादूर यांस कळविण्यांत येतें कीं, मुगभाटांत ब्राह्मण लोक राहण्याची एक चाळ आहे, तेथें एक नववयस्क ब्राह्मण विधवेची खाणावळ आहे. ती बाई आज मितीस आठ--नऊ महिन्याची गरोदर आहे. व तिच्या जवळ आप्तपिष्यापैकीं कोणीच नसून

ती मोठ्या संकटांत आहे. तरी योग्य बंदोबस्त ठेऊन होणारी बालहत्या बंद करावी. हा अर्ज!

खरोखर, ब्राह्मण लोकांत असले प्रकार वारंवार घडून येतात हें फार लाजीरवाणें आहे. सर्वांत उंच जात, आणि तींत सर्वांत नीच कर्म! ह्यापेक्षां इतर जाती बऱ्या नव्हत काय? बालविधवा त्यांच्यातच फार, कारण ते लोक पांच पांच वर्षांचेही मुलींचीं लग्नें करतात. आणि पुन्हां पुनर्विवाहाची मनाई! मग बापड्यांनीं अशीं कृत्यें केलीं तर त्यांजकडे काय दोष? शरीर धर्माप्रमाणें त्या वयांत आल्या कीं, त्यांजकडून असले गुन्हे साहजिकच होणार. मी पोलिसांत राहिल्यापासून अशीं अनेक उदाहरणें माझ्या पाहण्यांत आलीं आहेत. गंगेसारख्या पवित्र ठिकाणीं असल्या कुकर्मानें झालेलीं अर्भकें दर वर्षी शेंकडों पडतात ह्यापेक्षां पुनर्विवाह करणें किती चांगलें आहे? ज्या लोकांत पुनर्विवाहाची चाल आहे त्या लोकांत असले गुन्हे क्वचित् आढळतात. असें असतां, कित्येक जाती फुकाचा उंचपणा मिरविण्यासाठीं ब्राह्मणांचें अनुकरण करून व्यर्थ फसल्या जातात. केवढा हा मूर्खपणा! पण मी विचार करीत काय बसलों. सदर्हू बाईचा बारकाईनें तपास लावून ती साहेबांपुढें हजर केली पाहिजे. (जातो.)

---

# अंक पांचवा.

## प्रवेश २ रा.

**स्थळ**–मुंबई–सुगुणाबाईचे खाणावळीची खोली.

**पात्रें**–सुगुणी (बचंभटाची मुलगी व पिलंभटाची विधवा) विठ्ठलभट पुराणिक, पोलिसजमादार व दोन शिपाई. [सुगुणी अजारीपणाच्या वेशानें बिछान्यावर बसली आहे व जवळ विठ्ठलभट पुराणिक जेठा बांधून बसले असतां पडदा उघडतो.]

**सुगुणी**–आतां काय ह्मणून लाज धरायाची! अगोदरच अशा कामाला तयार झालां नसतां तर अशी अडचण कां पडली असती?

**विठ्ठलभट**–अगोदर कसला झालों होतों तयार आणि मला कशाची आली आहे अडचण? मी आपला सुटाच आहें. इकडे आलों ह्मणून दम देते आहेस वाटतें.

**सुगुणी**–काय ह्मटलेंत विठ्ठलभटजी तुह्मीं? बोला पाहूं पुनः! पहिलीं केलेलीं भाषणें विसरलांत वाटतें. लाज तरी वाटते आहे का आतां अशीं भाषणें बोलायला?

**विठ्ठलभट**–मघांच नाहीं का सांगितलें कीं, मला कशाची आहे लाज ह्मणून.

**सुगुणी**–विठ्ठलभटजी, हीचका तुमची दानत! वः खाशी सोय! ही माझी थट्टा का करतां अहांत?

**जमादार**–[येतो व स्वतःशींच] सकाळपासून एकसारखा तपास करतों परंतु, अजून कांहींच माग-

मूस लागत नाहीं. तरी या बैठे चाळीच्या बंद असलेल्या खोलींतच ती बाई रहात असावी. ह्मणून इकडेसच पाळत धरून बसावें. रात्रही बरीच झाली आहे. तेव्हां कोण येतें कोण जातें हें ही आपोआप कळून येईल. [ खोलीजवळ जाऊन व कानोसा घेऊन ] आंत कोणीसें बोलतें आहे. बहुत करून हे शद्ब बायको मनुष्याचेच असावेत.

**विठ्ठलभट**—थट्टा समज कीं वाटेलतें समज, मला त्याचें कांहीं नाहीं. जें मी सांगायचें तें एकदां सांगितलें. तुला जो कांहीं विचार कर्तव्य असेल तो करून घे ह्मणून!

**सुगुणी**—वः चांगल्या गोष्टी चालविल्या आहेत विठ्ठलभटजी तुह्मी. तुह्मी इश्वराला स्मरून सांगा कीं, ह्या असल्या गोष्टींत पहिल्यानें माझें वांकडें पाऊल होतें तरी का? माझें कपाळ फुटल्यावर माझ्या भावाशीं पटेना ह्मणून खाणावळ घातली. तेव्हांपासून गुरुमंत्राचीं वगैरे ढोंगें दाखवून तुह्मी मला नादीं लाविलेंत. आणि आतां फसवूं पहातां काय? हीच का तुमची नीति?

**विठ्ठलभट**—तुला विशेष बोलण्याची गरज नाहीं सांगतों आहें. आह्मीं हवें तें सांगितलें परंतु तूं आमच्या मागें लागावें कीं न लागावें, ह्याचा विचार अगोदरच करावयाचा होतास!

**सुगुणी**—काय ह्मटलेंत? अरे, अनाथ अबलेबरोबर कृष्णकर्म करून आतां लोकलाजेसाठीं विश्वासघात करतोस काय?

**जमादार**–[ स्वतःशींच ] आतां तर पूर्ण खात्री झाली. तरी जलदी करून उपयोगाची नाहीं. [ पुनः कानोसा घेतो. ]

**विठ्ठलभट**–[ फारच संतापून ] तोंड सांभाळ सुगुणे, तोंड सांभाळ! हा दुसरा कोणी समजली असशील पण ह्या विठ्ठलभटाशीं गांठ आहे. जीभ आंवर नाहीं तर दांत घशांत घालीन. समजलीस.

**सुगुणी**–हा! मेल्या कृष्णकर्म्या! जळलें तुझें तोंड एकदांचे तें. मला सर्वस्वीं नागवून, पुराणाला बसलें कीं, मोठ्या डौलानें डुलून वांकडे तिकडे डोकें करून, मला नादीं लावलें. नि आतां सुटा होऊं पाहतोस काय?

**विठ्ठलभट**–तुला हजारदां सांगितलें कीं, तोंड सांभाळ म्हणून. पण ऐकत नाहींस तर हें घे बक्षीस- [ मारतो ]

**जमादार**–शेवटीं पडलाच मारा. हेंही ठीक झालें.

**सुगुणी**–आई आई, मारलें हो मेल्यानें. आई! आई! आई! देवा! देवा!! देवा!!! [ सुगुणी विठ्ठलभटाचे हातून सुटून ओरडत ओरडत बाहेर पडते. विठ्ठलभट तिला ओढतो व सुगुणी सोडवा हो मला सोडवा असें ओरडते. ]

**जमादार**–वः संधि पण काय उत्तम आली. [ पुढें होऊन व विठ्ठलभटाचा हात धरून ] कशाकरितां या बाईला मारतां? आंत दुसरें कोण आहे?

**सुगुणी**–दुसरें कोणी नाहीं. हाच मेला माझ्या घरांत येऊन मला मारीत होता.

**विठ्ठलभट**–[ स्वतःशींच ] हर हर, घात झाला. करायला गेलों एक आणि झालें दुसरेंच. [ खिसा व कडोसरी चांचपून ] हातावर ठेवायला एक दिडकीही जवळ नाहीं. वेळ आली खरी. [ उघड ] शिपाईबोवा, माझा कांहीं एक अपराध नाहीं. मी आपला गरीब ब्राह्मण आहें. पोथी पुराणें वाचणारा. मजवर दया करा, मी तुमचा फार आभारी होईन.

**जमादार**–दया बिया कांहीं नाहीं. चुप बसा कसे. आतां काय होईल तें पहा ह्मणजे झालें.

**विठ्ठलभट**–एकूण नाहींच का मजवर दया होत? मी आपला गरीब ब्राह्मण आहें ह्मणून ह्मणतों. ब्राह्मणावर दया करणें हें तुमचें काम आहे. ईश्वर तुमचें कल्याण करील.

**जमादार**–(रागावून) एकदां सांगितलें ना कीं, चुप्प बसा ह्मणून. मी ओळखतों आहें तुह्मांसारख्या ब्राह्मणांस. शास्त्री, हरिदास, पुराणिक, भिक्षुक ह्यांच्याच हातून असलीं कृत्यें व्हावयाचीं. चुप रहा अगदीं. [ शीट वाजवितो व दोन शिपाई येतात ]

**सुगुणी**–[ आपल्याशींच ] अग बाई घात झाला. ( उघड ) शिपाईदादा मी आपली कर्मानें नाडलेली गरीब खाणावळवाली आहें. माझा कांहीं एक अपराध नाहीं. हा मजकडेस दररदिवस जेवायला येऊन पैसे न देतां, मारामारी करूं लागला. मी तुमच्या पांया पडतें मज अनाथ ब्राह्मणबाईवर

दया करा. मी तुमची धर्माची बहीण आहें. [ शिपायाचे पायां पडते ]

**जमादार**–( शिपायांस ) जा आणि या खोलीचा झाडा घेऊन दरवाज्यास कुलूप घाला. [ सुगुणीला ] बाई, तुह्मी भिऊं नका. हे भटजी महाराज खाणावळीचे पैसे न देतां, मारामारी करावयास लागलेना ? ह्मणून चला साहेबांकडे फिर्याद मांडायला !

**सुगुणी**–मला नकोती पंचाईत. आह्मां बायकांनां कशाला पाहिजेत असल्या उठाठेवी ? मला आपलें सोडाच. मी तुमच्या फिरून पायां पडतें.

**जमादार**–कशाला तुह्मी माझ्या पायां पडतां ? आतां तुह्माला कशाही काळजी पडणार नाहीं. तुह्मी आपल्या चला मजबरोबर. तुमच्या फिर्यादीची तजवीज सरकारांत अगदीं नीट करून ठेविली आहे. [ एक शिपाई कुलूप लाऊन किल्ली देतो. ]

**प० शिपाई**–सब अच्छे तऱ्हेसे तालाश किया. लेकिन अंदर बहुत माल पडा है. दुसरा कुच नहीं.

**दु० शिपाई**–तां सगळां घर संसाराचांच पडलां असा. दुसरां काय नाय.

**जमादार**–चला घेऊन या दोघांस चौकीमध्यें. मीं तुमच्या नाक्याच्या जागीं दुसऱ्या शिपायांची नेमणूक करून येतों. [ जातो. ]

**विठ्ठलभट**–शेवटीं नाहींच का तुह्मी मजवर दया करीत ?

( आपल्याशींच ) आजपर्यंत केलेल्या पातकांच्या झडतीची वेळ आली खरी. हर हर. आजपर्यंत माझे हातून अशीं अघोर कृत्यें किती घडलीं असतील बरें? 'तन, मन, धन, गुरुला अर्पावें.' अशा ढोंगी गुरुमंत्रानें किती अनाथ विधवांस सर्वस्वी नागवून धुळीस मिळविल्या असतील नकळे! तसेंच अनेक बालविधवांकडून कुंटणखाने घालवून किती गरतीबायकांस कुटुंबांतून उठवून कुमार्गास लावल्या असतील ह्या शिवाय .दैविक साक्षात्कार, ढोंगी अनुष्ठानें, टाणे टोणे, अशीं एकका दोन ह्मणून सांगावींत, सदैव नवीं नवीं थोतांडें काढून अगणित अपराध केले, त्या सर्वांची झडती आज मला द्यावी लागणार. खरोखर 'अशीं कृत्यें धर्माचे डंभ माजविणारे भिक्षुक, शास्त्री, हरिदास, ज्योतिषी ह्यांचेच हातून व्हावयाचीं' असें जें जमादार ह्मणाला तें कांहीं खोटें नाहीं.

**शिपाई**--चलो खडे कायकू रेहेतें हैं?

**सुगुणी**—नाहींच का तुमचे मनाला माझी दया येत? देवा, नारायणा, माझी लज्जा रक्षणारा तूंच आहेस. हाय! हाय! आज सर्वस्वीं मी अब्रूला मुकलें. मेल्या बापानेंच पैशाच्या लोभानें साठवर्षांच्या ह्मातार्‍यास मला विकली नसती, तर आज माझी ही दशा कां झाली असती? तसेंच ह्या मेल्यानें गुरूपदेशाचीं ढोंगें दाखवून मला सर्वस्वीं नाडलें. हाय! हाय! आतां या जगांत मला तोंड दाखविण्यासही जागा राहिली नाहीं. जळोत मेल्यांचीं

शास्त्रें नी पुराणें. सगळीं आमच्या दुःखाला कारण करून ठेविलीं आहेत. आगलागो मेल्यांच्या तोंडाला. मेले लोकांत धर्माचे डंभ घालून आमच्या सारख्या गरीब गाईस जे दुःख देण्याला तयार होतात [ बोटें मोडून ] त्या मेल्यांचें तळपट होवो एकदांचें ?( जातात. )

---

# अंक ५ वा.

## प्रवेश ३ रा.

**स्थळ**–मुंबई–विठोबाचें देवालय.

**पात्रें**–ठमाबाई, विठाबाई, साळूबाई, रंगुताई व कृष्णशास्त्री.

**विठाबाई**–आज पुराणिक बोवानां भारीच बाई उशीर झाला हो पुराणाला यायला. हो पण ऐकलेंका ठमाबाई, विठ्ठल भटजींची वाणी कीं नाहीं भारीच बाई गोड आहेहो ! एकदां का पुराण सांगायला बसले नि तो भागवतांतला राधाकृष्ण विलास सांगायची सुरुवात केली, कीं तनमन अगदीं वेधून घेतात हो ते आपलेकडेस.

**ठमाबाई**–खरेंचग विठाबाई, मी आज नाहीं तरी बरेच शास्त्री, पुराणिक, हरदास बघितले हो पण ही तोड कांहीं निराळीच आहे. पण बरी बाई आठवण झाली, हे विठ्ठल भटजी गुरूपदेश देखील देत असतातना? मी आज बरेच दिवस ऐकतें आहें देत असतात असें.

**विठाबाई**—तुह्मांला घ्यायचा आहेका ठमाबाई गुरूपदेश ? घेणें असेल तर जसें ह्मणून पात्र हवें तसें आहे हो अगदीं. ते पुराणिक ह्मणायचे मात्र, बाकी एकविभुतीच आहे बाई. ती खाणावळवाली सुगुणी, तिचें देखील हें ( मस्तकाकडे बोट दाखवून ) असें झालें तेव्हां, कांहीं तरी तरणोपाय व्हावा ह्मणून तिनेंही घेतला आहे हो ह्यांचेच पासून गुरूपदेश. ( इतक्यांत साळूबाई व रंगुताई येतात. )

**रंगुताई**—हें कसें झालें कोण जाणे ! सुगुणीचे हातून असें होईल असें नव्हतें हो वाटत. पण, विठ्ठलभटजींनींच तिला नादीं लाविलें.

**साळुबाई**—खरेंच ग बाई. अब्रूला मात्र मुकली हो बिचारी. ( मोठ्यानें सुस्कारा सोडून ) देवा, नारायणा, तुला रे बा डोळे. सर्वांची लज्जा रक्षिणारा तूंच आहेस.

**रंगुताई**—आमच्या शेजारचे ते कृष्णशास्त्री, त्यांच्याही मुलीबद्दल गांवांत असाच चवचवाट चालला आहे. नी या सुगुणीची गोष्ट ऐकल्यापासून भारीच बाई सुरवात झाली आहे.

**साळुबाई**—ह्मणजे? कांहीं झालें आहे वाटतें.

**रंगुताई**—तसें कांहीं नाहीं. पण कृष्णशास्त्री स्वतः शास्त्री असून त्यांणीं मुलीला सोंवळी केल्यावांचून तशीच ठेविली आहे, तेव्हां सोंवळ्या ओंवळ्याचाही धरबंद नसेल, नि पुनः जर का अशीच ठेवली तर सुगुणीसारखेंच एखाद वेळ वांकडें पाऊल पडेल त्याचा नेम का आहे?

सातां नवसांनीं वाढविलेली जरी एकुलती एक असली, तरी नशीचीं आलें तें केलेंच पाहिजे.

**साळुबाई**–तोंडांनीं हवें तसें बोलतां येतें पण ज्याच्यावर प्रसंग येतो त्यालाच तो चांगला समजतो. लोकाला काय आणि तुह्मांला काय उचलली जीभ आणि लावली टाळ्याला आह्मांला त्याचा सगळा अनुभव आहे. मुगुणीला नव्हती का सोंवळी केली, पण झालें ना व्हायचें तें?

**ठमाबाई**–अजून पुराणाला कुणीच आलें नाहीं, हें काय? (रस्त्याकडे बघून व कांहीं बाया येत होत्या त्यांस पाहून) ह्या बघा आल्या.

**साळुबाई**–अजून नाहींच का ऐकलेंत पुराण? ऐकाल तर आतां! (असें ह्मणून देवाला नमस्कार करून बसते.)

**ठमाबाई**–ह्मणजे? तुह्मी काय ह्मटलें तें मी कांहीं समजलें नाहीं.

**साळुबाई**–तुह्मी वेड्याचें सोंग का घेत अहांत ठमाबाई? तुह्मी नी विठाबाई सगळ्या मुंबईची डांक अहांत. नी हें कसें?

**विठाबाई**–साळुबाई आज अगदीं संदिग्धसें बोलत अहांत? सांगा बाई काय असेल तें.

**रंगुताई**–खरंच ठाऊक नाहीं? (साळूबाईकडे वळून) मग सांगा बाई विठाबाईला उघडें उघडें करून.

**साळुबाई**–(हातांनीं दाखवून) झालें हो तुमच्या

सुगुणीच नि नेले हो सरकारांत. तुमच्या पुराणिकबोवांना आणि सुगुणीला. पडलें बाई आजारीपणाचें ढोंग बाहेर! ती हल्लीं धर्माच्या दवाखान्यांत आहे.

**विठाबाई**—खरेंच का? कमाल झाली बाई सुगुणीची!

**साळु व रंगु**—एकट्या सुगुणीचीच नाहीं हो ही करणी! उगीच तिला बिचारीला कां दोष देतां? (एकटी साळुबाई ह्मणते) विठ्ठलभटजींचाच गुरूपदेश नडला हो तिला. असल्या गोष्टी बायकांकडून कांहीं पहिल्यानें होत नसतात. ह्याला पुरुषांचेंच मुख्य उत्तेजन लागतें. बायकांची किती जरी वाईट बुद्धि होत असली, तरी त्या लाजेकाजेनें कांहीं तरी राहतील, परंतु पुरुषांच्या धाडसी संगतीवांचून वाईट कामाची इच्छा होत नसते.

**रंगुताई**—खरंच बाई, जरी ती ज्वानपणांतच कर्मानें नाडली होती, तरी ह्मणजे असल्या कामीं पहिल्यानें नव्हती हो तिची बुद्धि धांवली. ह्या पुराणिक बोवांनींच तिला हजार बयादी सांगून व गुरुमंत्राचीं ढोंगें दाखवून साधलें हो काम. साहेबाकडे ह्याची चांगली चौकशी होऊन विठ्ठलभटजींस दंड सुद्धां झाला. नी ते सोडल्याबरोबर मुंबईतून पळाले देखील ह्मणतात.

**साळुबाई**—अहो हें पहा आमच्या सारखी एखादी कर्मानें नाडली, कीं, तिला ईश्वरसेवेंत काळ घालविण्याची साहजिक बुद्धि होते. आणि मग ती असल्या धर्माचे दे-

व्हारें माजविणाऱ्या लोकांच्या हातून सहज फसते. शास्त्री, पुराणिक, हरिदास, भिक्षुक, हे कमी नका हो समजूं ठमाबाई तुह्मीं. असल्या कृत्यांत त्यांचा पुढें पाय. बकध्यानी मेले! ( इतक्यांत कृष्णशास्त्री येतात. )

**कृष्णशास्त्री**—( स्वतःशींच ) ह्या इतक्या विधवा स्त्रिया जमून ह्यांचा विचार तरी काय चालला आहे येथें! वचंभटाच्या पोरगीविषयीं तर नसतीलना ह्यांच्या गप्पा! तेव्हां ऐकावेंच जरा. ह्या विधवा ह्मणजे **एक वर्तमान पत्रच** असतात. ( असें ह्मणून आड उभा राहतो. )

**विठाबाई**—ह्यापेक्षां, जर आपल्या ब्राह्मण लोकांत अशा बालविधवांचीं पुनः लग्नें करावयाची चाल सुरू झाली, तर असल्या वाईट गोष्टी नाहीं हो व्हायच्या.

**साकुबाई**—पण हें होणार कसें? आमच्या शास्त्री, भिक्षुक, मंडळीच्या मनांत हवेंना यायला! हल्लींच्या इंग्रजी शिकलेल्या मंडळीनें थोडीका खटपट चालविली आहे. त्यांना कायसे हे मेले " सुधारक सुधारक " असें ह्मणतात. त्यांनीं बालविधवांचीं पुनः लग्नें करावींत, बायकांना विद्या शिकवावी, मुलामुलींचीं लहानपणीं लग्नें करूं नयेत, बाप मुलींना विकतात तसें विकूं नये; तसेंच विधवा बायकांना सोंवळ्या करतात त्या करूं नयेत, हें शास्त्राप्रमाणें आहे असें ठरवून सभा देखील केल्या. पण हे मेले हेंकड ऐकतील तेव्हां ना? अशा गोष्टी काढल्या पुरे कीं, आम-

च्या शेजारचे ते शास्त्रीबोवा कानांत बोटेंच घालतात. नि ह्मणे आमचें चाललें आहे तें खरें. माझा बाप जें करीत होता, तें मला करायचें, विधवाबायकांना, सोंवळ्या करायच्या त्या करायच्याच त्यांचीं पुनः लग्नें ह्मणून करूं द्यायचींच नाहींत. राह्यच्या असल्या तर राहतील, नाहीं तर जातील एखाद्याचा हात धरून.

**ठमाबाई**—खरेंचहो बाई त्यांच्या मनांत आह्मींच सगळीं सुखें भोगावीं, बायका मरोत जावोत त्यांचें कांहीं होवो. मेले आपमतलबी सगळे. बारा वर्षांचे मुलीला देखील सोंवळी करायची मेल्यांची बुद्धि. त्यांना असें नाहीं समजत कीं, एक कर्मानें नाडली ह्मणून लेण्यालुगड्यांतही नये का तिची हौस पुरूं? आमच्या चाळींत पण असाच एक खाष्ट आहे, अशी कोणी बघितली कीं, सुटलाच शिव्या-देत अजून कां सोंवळी केली नाहीं ह्मणून! पण मेला असें नाहीं समजत कीं सोंवळी केलीनी हवें तें केलें ह्मणून तिलाच जर नाचायचें असलें, तर ती राहणार का आहे?

**साळुबाई**—सोंवळी केलीनी हवें तें केलें, ह्मणून मनाचे विकारका कोणाच्यानें सोंवळे करवणार आहेत? एखाद्या मुलीला सोंवळी केल्यावर आपल्या सासरच्यांस तसेंच माहेरच्यांस तोंड दाखविण्यास तिला किती बरें लज्जा उत्पन्न होते? नी त्यांतून कुठेंच कुणाचा आधार नसला ह्मणजे आपलें तें तोंड घेऊन पोळपाट लाटणें घेऊन नाहीं तर शे-

वटीं तांब्या घेऊन 'काशीविश्वेश्वरायनमः' ह्मणत भिक्षा मागावी लागते! अशा गोष्टींत ह्मणजे परक्या पुरुषांशीं सदां बोलण्याचा प्रसंग यायचाच. तेव्हां नाहींका तिच्या बुद्धीला फरक पडणार? असें झालें कीं बिचारीच्या फजितीस कठून पार राहणार? मग काय विचारतां, लोकांनां नी त्यांत मेल्या भटुर्ग्यांना नी शास्त्र्यांना जसा ऊतच येतो. जरा कुणी आमच्या सारखी बघितली कीं, लागलेच कुटाळ्या करून हंसायला. पण मेल्यांना असें नाहीं समजत कीं, घाटी-मोची सुद्धां हीं तुमची वर्मंकर्में काढून हंसतात. काल तर तो शिपाई देखील बोलला त्या मेल्या विठ्ठलभटजीला कीं, हीं असलीं कामें शास्त्री, भिक्षुक, हरिदास, पुराणिक ह्यांच्याच हातून व्हायचीं ह्मणून. पण लाज का आहे त्यांना? आमच्या सारख्यांना सर्वस्वीं लुबाडूनच तर मेले पोटें भरतात.

रंगुताई—आज आमच्या घरीं पुरुष मंडळींत हाच वाद चालला होता. मुली मोठ्या वाढवाव्या. विधवांचीं लग्नें करावींत. असें निघालें मात्र तोंडांतून तोंच शेजारच्या शास्त्रीबोवांनीं कहर करून सोडला. ह्मणे तुह्मीं इंग्रजी शिकून अगदीं भ्रष्ट झालांत. तुह्मांला इंग्रजाचें तेवढें बरें वाटतें. पत्रिकेचा बरोबर इष्टकाल साधून मुलामुलीचें घटित जमवा. मग जरी पाळण्यांत लग्नें लावलीं तरी हरकत नाहीं. असें असतां कशाला पाहिजेत हे पुनर्विवाह. कांहीं नको.

असें पुष्कळ बकला. पण त्याचें ऐकलें आहे कुणी ? मग खूप झाली त्याची फजिती. तरी त्याचें ह्मणून त्यानें सोडलें नाहीं. असे मेले हट्टी असतात.

**साळुबाई**—तुमच्या कृष्णशास्त्र्यानीं थोडीं का बघितलीं होतीं टिप्पणें ? तोही मेला अशांतलाच हट्टी होता. पण बरें झालें आतां त्याला पुरता अनुभव आला आहे.

**कृष्णशास्त्री**—आली आतां माझ्यावरही बारी आली.

**ठमाबाई**—खरेंच बाई असेंच त्याणें आठ वर्षांच्या मुलीचें लग्न करून तिच्या संसाराची मात्र धुळधाणी केली. काय मेली दुष्ट सासरचीं माणसें तरी. मारून मारून तिचीं तीन हाडकें केलीं नी सगळें आंग डागून काढलें हो मेल्यांनीं! लोकाची मुलगी झाली ह्मणून भाजावें का तिला ? खरेंच सांगतें ठमाबाई, आपल्या लोकांत कीं नाहीं मुलींची किंमतच नाहीं. जशी एखादी धोंड लोटतात तशी लोटायची. नवरा ह्मातारा असो, तरणा असो किंवा कसाही असो. नी त्यांत पैसे घेऊन विकणांराची तर कमालच. वर्षास शेंकडा चढायचा. जितकी मोठी वाढेल तितके रुपये जास्त यायचे.

**विठाबाई**--( स्वतःशींच ) असेंच माझ्या सासरच्या माणसांनीं दुःख दुःख दिलें नी गांवोगांव धिंदवडे होऊन पोटासाठीं मला पुष्कळ वाईट कृत्यें करावीं लागलीं.

**कृष्णशास्त्री**—( स्वतःशींच ) हर हर, या बाईनें माझ्या

मुलीच्या दुःखद स्थितीचें हुबेहुब चित्र उभें केलें. परक्यांना देखील हें ऐकून दया उत्पन्न झाली. परंतु त्या यमस्वरूपी सासरच्या माणसांना तिची तिळमात्र दया आली नाहीं. कस्ची येणार कसाबच तीं !

ठमाबाई–चला बाई संपलें पुराण. देव करो नी आमच्या सारख्या बालपणांतच कर्मानें नाडलेल्यांना पुनः सुखीकरण्याची बुद्धी आमच्या लोकांस होवो. नी ह्या निर्दय व हेंकड लोकांचें लौकर निसंतान होवो. ( असें ह्मणून बोटें मोडते. )

सर्वजणी–( देवापुढें जाऊन ) ज्या मेल्यांना आमचें वाईट पाहण्याची बुद्धि असेल, त्यांचें एकदांचें तळपट वळो. नी आमच्या सारख्यांनीं दिलेले अभिशाप त्यांच्या माथीं पडोत ( बोटें मोडतात ) देवा मायबापा आतां तरी तुला करुणा येऊन आमच्या लोकांच्या मनांत दया उत्पन्न कर, सर्व जगाचा त्राता तूं आहेस ( असें ह्मणून देवाला नमस्कार करून जातात. )

कृष्णशास्त्री–( त्या गेल्यासें पाहून ) खरोखर ह्या विधवा स्त्रियांचे दुःखपूरित शाप नित्यशः सहस्त्रावधि आमच्या मस्तकीं पडत असतील. ह्मणूनच आह्मी ब्राह्मण लोक, विद्येनें, शौर्यानें व नीतीनें दिवसानुदिवस सर्वप्रकारें लय पावत चाललों आहोंत. यांत मुळींच शंका नाहीं ( विचार केल्यासारखें करून ) हर हर, "चिता चिंता समाख्याता ॥ बिंदुमात्र विशेषतः ॥ सजीवं दहते चिंता ॥ नि-

**जीवं दहते चिंता ॥** ह्या सुभाषितांत ह्मटल्याप्रमाणें माझी स्थिति झाली आहे. चिता ही मरणोत्तर मनुष्याला जाळते परंतु चिंता ही सजीव मनुष्याच्या हृदयांत एकसारखी भडकत राहून जाळते. ह्मणून चितेपेक्षां चिंता ही जास्त आहे. अहा हा ! किती तिची अचाट शक्ति, कीं घरांत असलों, अथवा निजलों असलों तरी तिच्या प्रखर ज्वाला, माझ्या हृदयास जाळून त्यांचें भस्म करण्यास तयार असतात. (विचार करून) त्या बिचाऱ्या बचंभटाच्या मुलीविषयीं गावांत ज्या चर्चा चालल्या आहेत व तिचे जे धिंदवडे झाले, ते ऐकून माझ्या कल्पनाशक्तीचा जोर कांहीं अनिवार होत चालला आहे. आणि त्यांत त्या बायांनीं तर, आपल्या भाषणरूपी तैलानें माझ्या चिंताग्नीस विशेषच प्रज्वलित केलें. ज्वानी ही स्त्रियांना काय आणि पुरुषांना काय सारख्याच दुःखद परिणामावस्थेला पोंहचविते. तेव्हां न जाणो कदाचित् माझ्या मुलीच्या हातून आज जरी नाहीं तरी कालांतरानें अशा परिणामाची गोष्ट घडून आली तर ! कारण तारुण्य हें शारीरिक व मानसिक विकारांस प्रबल करणारें जीवन आहे. आतां माझ्याकडून काय आणि माझ्या बायको कडून काय तिच्या ह्या अशा स्थितींत कोणतेही प्रकारें तिच्या बुद्धीला फेर पडूं नये ह्मणून जितकें होईल तितकें करून कर्मणुकीच्या गोष्टींत व कामा काजांत सुबोध करतोंच आहोंत. तसेंच द्राष्टांत व दृष्टांत

देऊन तिची समजूत करतोंच; तरी देखील तिच्या मानसिक विचाराचा जोर ह्मणजे कमीच पडून राहील ह्याचा भरवंसा धरवत नाहीं, उघडच आहे. ईश्वरनिर्मित जे शारीरिक शक्तीचे जोर, ते आह्मां मनुष्यांच्या हातून कधींही नाश पावणार नाहींत. ( इकडे तिकडे फिरून ) काय हे माझ्या मानसिक शक्तीचे तरंग एकसारखे उचंबळत आहेत! बरोबर आहे, त्यांनीं तरी कां उचंबळूं नये? एक तर माझी सचिंत स्थिति आणि त्यांत दुसरें प्रत्यक्ष प्रमाणासह प्रत्यंतर! अहाहा! जर मी मघां इकडे आलों नसतों, तर चांगलें झालें असतें. त्या बायांपैकीं प्रत्येकीचें भाषण माझ्या ह्रयदाला टोंचीत आहे. त्यानीं बालविधवेची वर्णिलेली दुःखद स्थिति, तिच्या आईबापाच्या मनांत रात्रंदिवस कशी कटारीसारखी बोंचत असते, ह्याचें केलेलें वर्णन माझ्या हृत्पटलावर कसें अगदीं अचूक बंदुकीच्या गोळीसारखें भोंक पाडून बसलें आहे. “ तुका ह्मणे येथें पाहिजे अनुभव ।। फुकाचा गौरव कामा नये ” ही तुकारामबोवांची उक्ति अगदीं अक्षरशः खरी आहे. तसेंच बालविधवेचें दुःख तिच्या आई-बापाशिवाय इतरांस कोठून समजणार? “परदुःख शीतल” ह्मणतात तें कांहीं खोटें नाहीं. हा गुलामा सखारामभट्टा! अरे परक्याची मुलगी झाली ह्मणून त्वां आपल्या स्वार्थासाठीं अशा युक्त्या योजाव्या काय? तीं तुझीं भाषणें अद्याप माझ्या हृदयांत एकसारखीं सलत आहेत. हा नराधमा, अशीं भाषणें तुझ्या मुखांतून निघतांच तुझ्या

जिव्हेचे तुकडे तुकडे कसे नाही झाले! (विचारकरून) पण मी त्याला काय ह्मणून दोष देऊं? मी काय कमी आहें? त्याचाच जोडीदार व धर्माभिमानाचा टेंभा मिरविणारा, परंतु जसजसे मजवर प्रसंग येऊन गुदरले तसे तसे ते माझे विचार, तीं माझीं शास्त्रें, व तद्विषयक माझें कट्टें वाक्‌पांडित्य सर्व एका बाजूस झुगारून द्यावींशीं आज मला वाटत आहेत. त्यांत मी स्वतः शास्त्री असल्यामुळें धर्मशास्त्र ह्मणजे काय हें मला चांगलें कळत आहे. पण आजवर गतानुगतिक लोकांप्रमाणें व आमच्या मूर्खपणाच्या चालींप्रमाणें मला चालणें भाग पडलें. त्यांतून सर्वांपेक्षां आह्मां शास्त्री लोकांचा हा बाणाच आहे कीं, माझा बाप जें करीत होता तेंच मला करावयाचें, दुसऱ्या तिसऱ्या भानगडींत पडण्याची आह्मांला जरूर नाहीं. असा आमचा निग्रह असल्यामुळें, मला तसें वागणें भाग पडत आहे. परंतु त्याचा काय उपयोग? अशा स्थितींत मुलीला ठेवणें ह्यापेक्षां पुर्ता संसारसुखानुभव घेईल असें करण्यांत कांहीं वावगें नाहीं. परंतु ह्या चाली आज शेंकडों वर्षें आमच्या हाडीं मासीं खिळून गेल्यामुळें, त्यांचें उल्लंघन करणें फारच दुरापास्त आणि त्यांतून माझ्यासारख्या शास्त्री ह्मणवून घेणाऱ्यानें पुढाकार करणें ह्मणजे त्याहूनही दुर्घट. एकंदरींत आडकित्यांत सुपारी सांपडावी, तद्वत् माझी स्थिति झाली आहे. (इकडे तिकडे फिरून) जर तिचें लग्न लहानपणांत केलें नसतें, तर आज हा प्रसंग मजवर कां आला

अमता व इतकें विचारांत पडण्याचें कारण तरी कां झालें असतें! परंतु त्यावेळीं, वृथाभिमानाची घमेंड मारण्याकरितां, मुलीचें लग्न करून आमच्या मनाचीं कोडें मात्र पुरविलीं आणि आतां तिच्या जन्माचें मातेरें करून हाय हाय ह्मणत बसलों आहोंत. जर मी त्यावेळीं विनायकाचें ह्मणणें ऐकलें असतें, तर आजला ही स्थिति आली नसती. हो बरी आठवण झाली. विनायकाची बदली पुनः येथें झाल्यामुळें, तो आज येणार आहे. हेंही बरेंच झालें. आतां मी ह्मणजे ह्या प्रखर चिंताग्नीच्या सपाट्यांतून फार दिवस वांचेन असें माझें मलाच वाटत नाहीं. तेव्हां निरर्थक राग व केलेली प्रतिज्ञा एके बाजूस गुंडाळून ठेवणें हेंच मला इष्ट वाटत आहे. काय त्याची ममता! मी इतका रागावलों असतां देखील त्यानें आपलें कर्तव्यकर्म योग्य बजावलें; नाहीं तर माझी यमू पुनः माझ्या दृष्टीस पडण्याची मुष्किलच होती. एकंदरींत माझ्या खऱ्या मायेचा तोच असून सत्यप्रीतीनें माझ्या दुःखाचा वांटेकरी होणारा तोच आहे. तेव्हां हा सगळा संसाराचा बोजा त्याच्याच मस्तकावर ठेवून आपण हरि हरि ह्मणत बसावें हेंच योग्य. ( देवालयांत आर्ती होते व कृष्णशास्त्री पांडुरंगाचें दर्शन घेऊन जातात.)

पा

# अंक पांचवा.

## प्रवेश ४ था.

**स्थळ**–मुंबई–गोपाळरावांच्या बंगल्यापुढील पटांगण.

**पात्रें**–गोपाळराव, बाळकृष्णपंत, विश्वासराव घोरपडे
( गोपाळरावांचे मित्र )

**विश्वासराव**–खरोखर तुमच्या ब्राह्मणलोकांत मोठा अंधार आहे. सर्वांत उंच जात आणि त्यांत असलीं नीच कर्में! काय हा चमत्कार? असले निंद्य प्रकार सदैव होत असतांही, तुमचे डोळे अजून कसे उघडत नाहींत? अहो, आह्मीं इतर जातींचे असूनही आमच्यांत असले प्रकार बहुधा घडत नाहींत. परंतु तुमच्या लोकांस असल्या गोष्टींची मुळींच खातरजमा वाटत नाहीं हें काय?

**बाळकृष्णपंत**–करणार काय? आमच्या धर्माधिकारी लोकांचे डोळे उघडत नाहींत ना? त्यांना आपली रूढिमाताच बरी वाटते. शास्त्र व विचार यांजकडे लक्ष देतें कोण? आमच्यांत कांहीं कां होईना? आह्मांला आपले उंच ह्मणा ह्मणजे झालें. यांतच काय तो आमचा मोठेपणा!

**विश्वासराव**–खरें बोवा, कमाल आहे शास्त्री, भिक्षुक मंडळींची. मी खरेंच सांगतों, जोंपर्यंत अज्ञान आहे, तोंपर्यंत तुमच्यांत कोणतेच प्रकारची सुधारणा जारीनें न होतां दुही मात्र विशेष वाढेल.

**गोपाळराव**—तुमचें ह्मणणें अगदीं बरोबर आहे. बालविवाहापासून केवढे वाईट परिणाम होतात, पण त्यांकडे कोणीच लक्ष पुरवीत नाहींत. तसाच कन्याविक्रय. पण द्रव्यलोभापुढें त्यांस कांहींच दिसत नाहीं. नवरा ह्मातारा असो, रोगी असो, निर्धन असो, किंवा कसाही असो. रुपये मात्र जास्त मिळाले ह्मणजे झालें. मग मुलीचें कांहींका होईना!

**विश्वासराव**—खरेंच मी तर असे किती प्रकार पाहिले आहेत. कित्येक विधवा ब्राह्मणबाया भीका तर मागतातच परंतु, वेश्यांसारख्या अत्यंत नीच कर्म करणाऱ्यांच्या घरीं दास्यत्व करतात. हें पाहून मनाला फारच वाईट वाटतें. असल्या निंद्य स्थितीपेक्षां पुनर्विवाह काय वाईट? हो बरी आठवण झाली. इकडल्यापेक्षां, गुजराथेंत तर फारच अंधार! कन्याविक्रयाविषयीं तर बोलूंच नका. मोठा सपाटा! याशिवाय दोन दोन वर्षांच्या हो मुला मुलींचीं टाकतात लग्नें करून! त्यांचें लग्न ह्मणजे पोरखेळांतील बाहुला बाहुलींचींच लग्नें!! आणि पुनः कित्येक उंच जातींत तर पुनर्विवाहाची मनाई! मग कां बरें अनाचार वाढणार नाहींत? आणि त्यांत त्या धर्मभोळ्या लोकांस शास्त्री, भिक्षुक लोकांची फूस. कशी पण भुरळ घालतात. त्यांची आपली समजूतच! विद्या वाढून सुधारणा वृद्धिंगत झाली कीं, आमच्या पोटावर पाय येणारच आणि तें ही खरेंच. भोळ्या भावड्या स्त्रीपुरुषांस थोथांडें सांगून पैसे काढावयाचें काम बंद पडणार.

**गोपाळराव**—उघड आहे. ह्यासाठींच शिक्षणक्रम वाढला पाहिजे. जसे पुरुष सुशिक्षित होत चालले आहेत, त्याप्रमाणेंच स्त्रियाही सुशिक्षित झाल्या पाहिजेत. ह्मणजे आपोआप सर्व कांहीं नीट होईल. एक या आमच्या स्त्री-समाजामध्यें अशिक्षितपणा असल्याच्या योगानें धर्माचें देव्हारें माजविणाऱ्या शास्त्री—भिक्षुक लोकांच्या मोहजालांत किती आमच्या आर्यभगिनी सांपडतात. परंतु तें त्यांच्या अज्ञानामुळें त्यांस मुळींच कळत नाहीं.

**बाळकृष्णपंत**—ह्यासाठींच स्त्रीसमाजांत जारीनें सुधारणा झाली पाहिजे. सुशिक्षित स्त्रियांकडून नेहमी मुलींच्या शाळांतून तसेंच स्त्रीसमजांतून व्याख्यानें झालीं पाहिजेत. अशाशिवाय आपले इष्ट हेतु सिद्धीस जाणार नाहींत. ठीक झालें विनायकरावही पुनः इकडेस आले. त्यांच्याशिवाय ह्या कामाची विशेष चळवळ चालू होणार नाहीं.

**गोपाळराव**—आणि हेंही ठीक झालें कीं, सनातनधर्मप्रसारकब्रह्मसभेचें प्रस्थ साफ खालीं बसलें. आणि कृष्णशास्त्रीही हळू हळू ताळ्यावर येत चालले आहेत. इतकेंच नव्हे तर ते बापुसाहेबांचे परम मित्र बनले आहेत ह्मटलें तरी चालेल.

**बाळकृष्णपंत**—अनुभव येत चालला कीं आपोआप सुरळीत चालतें. असो विनायकराव आले हा एक शुभशकूनच समजावयाचा. [ पडदा पडतो.]

---

# अंक पांचवा.

## प्रवेश ९ वा.

**स्थळ**-मुंबई-आर्यमहिलासमाज.

**पात्रें**-( सुईण ) लक्ष्मीबाई, सुशीला, व चिमुताई, इतक्या स्त्रिया बसल्याअसतां पडदा उघडतो. )

**चिमूताई**-( उठून ) आजच्या सभेचें अध्यक्षस्थान माझ्या प्रिय मैत्रिणी सुईण लक्ष्मीबाई ह्यानीं स्वीकारावें अशी त्यांस माझी विनंति आहे.

**एक बाई**-माझेंही असेंच मत आहे.

**सु० लक्ष्मीबाई**-तुमचा सर्वांचाच मनोदय तसा आहे तर मी मोठ्या खुशीनें अध्यक्षस्थान स्वीकारतें. ( बसते व टाळ्या वाजतात )

**चिमूताई**-आजच्या सभेंत सौ. सुशीला बाई ह्या " आमचा स्त्रीसमाज " ह्या विषयावर व्याख्यान देणार आहेत.

**सुशीला**-[ मेजा जवळ उभी राहून ] " माझ्या प्रिय भगिनींनो-आजचा विषय ' आमचा स्त्री समाज' हा आहे. हा विषय इतका व्यापक आहे कीं, त्याजवर एक मोठासा ग्रंथ सुद्धां लिहितां येईल. ह्मणून आज आपण थोडक्यांत ह्यांतील मुख्य मुख्य मुद्यांचा विचार करूं. जगन्नियंत्या परमेश्वरानें ह्या जगांत संसाररूपी स्त्री व पुरुष अशीं दोन

चक्रें निर्माण केलीं आहेत खरीं, पण तीं दोन्हींही चांगलीं मजबूत असलीं पाहिजेत. त्यावांचून गाडी सुरळीत चालावयाची नाहीं. परंतु आमच्या आर्यदेशांतील संसाररूपी गाड्याचें स्त्री हें चक्र अगदीं मोडकळीस आलें आहे. असें होण्याचीं अनेक कारणें आहेत. त्यांतील मुख्य ह्मटलें ह्मणजे स्त्रीसमाज सुशिक्षित नसणें हें होय. पुरातन कालीं आमचे आर्य लोक, आपला स्त्रीसमाज सुशिक्षित होण्यासाठीं यत्न करीत असत; ह्मणूनच त्यावेळीं, आमच्या आर्यावर्ताची स्थिति चांगली होती. अशाबद्दल आपले इतिहास व पुराणें अद्याप साक्ष देत आहेत, स्त्रीशिक्षणाच्या अभावामुळें, आपल्या समाजास आज निकृष्टावस्था प्राप्त झाली आहे.

( १ ) स्त्रिया सुशिक्षित नसल्यामुळें, संसारांत आपण कोणत्या प्रकारें वागलें असतां, आपलें हित होईल हें त्यांस मुळींच कळत नाहीं. उलट त्यांच्या हातून अनेक वाईट प्रकारचे प्रमाद होतात. तसेंच सास्वांनीं आपल्या सुनांशीं व आयांनीं आपल्या मुलींशीं कसें वागून त्यांची ममता संपादन करावी हें त्यांस मुळींच कळत नसतें; यामुळें घरांत नित्यश्रीनित्य मंगलाच्या ऐवजीं सासू, सुना, जावा, नणंदा, आदिकरून स्त्रिया परस्परांत प्रत्यहीं वडील धाकटेपणाचा मान न राखतां, जणूं आपल्या प्रजेस आपल्या दुर्वर्तनाचें उदाहरण घालून देण्यासाठीं, भांडत असतात. फार काय सांगूं? त्या अशिक्षित स्त्रीसमू-

हापुढें घरांतील शहाण्या विद्वान व पोक्त पुरुषांलाही अगदीं चुप्प होऊन बसावें लागतें. पण जर का तोच पुरुषसमुदाय त्या स्त्रीसमूहासारखा अशिक्षित असला, तर मग विचारूं च नका. हातघाईचाच प्रसंग यावयाचा. असे चांगल्या चांगल्या घराण्यांत होत असलेले कलह व त्यांपासून होणारे लाजिरवाणे परिणाम माझ्या प्रिय भगिनींनीं बरेच पाहिले असतील.

( २ ) आमचे लोक वेड्यासमजुतीनें आपल्या मुली बाल्यावस्थेंत असतांच त्यांचीं लग्नें करून टाकितात ह्यामुळें धर्मशिक्षण व नीतिशिक्षण हें जें प्रत्येक आईबापांचें मुख्य-कर्तव्यकर्म तें त्यांच्या हातून होत नाहीं. पहा कीं, मुलीचें बाल्यावस्थेंतील अहारविहारादि स्वेच्छाचार ह्यांकडे पाहिलें ह्मणजे नवरा ह्मणजे काय? सासूसासऱ्यांची योग्यता कोणत्या प्रकारची? लग्न ह्मणजे काय व तें कां करतात, तसेंच गृहिणीची योग्यता किती आहे? वगैरे गोष्टी त्या आठ दहा वर्षांच्या अज्ञान मुलींस कुठून समजणार? त्यांचें सर्व चित्त माहेरच्या सुखाकडेस असावयाचें हें उघड आहे. मुलींस सुशिक्षण देऊन स्त्रीधर्म ह्मणजे काय व त्या प्रमाणें आपल्याला आपल्या भर्त्याकडेस कसें वागलें पाहिजे ह्याचें ज्ञान झाल्यावांचून त्यांस एकदम परवशतेच्या बंधनांत नेऊन टाकतात. ह्यामुळें असल्या मुलींच्या हातून अज्ञानपणामुळें, आपल्या स्त्रीधर्माला न शोभण्या

सारखे अनेक प्रमाद होतात. व तेव्हां पासूनच आपल्या सासूसासऱ्याच्या प्रीतींतून उतरतात. माझ्या प्रिय भगिनींनो विचारकरा कीं, स्त्रियांचें मुख्य कर्तव्यकर्म संसारांत टापटिपीनें वागणें व आपल्या भर्त्यास नेहमीं खुश ठेवून आपल्या प्रजेला सुशिक्षेनें वळण लावून देणें हीं महत्वाचीं कामें अशिक्षित अशा स्त्रीसमाजाच्या हातून कितीशीं योग्य बजावलीं जातील? ह्यासाठींच मुलींचीं बाल्यावस्थेंत लग्नें न करतां, त्या सुशिक्षित होण्याचा जितका यत्न होईल तितका करणें हें आपल्या समाजाचें आज मुख्य कर्तव्यकर्म आहे.

( ३ ) त्यांपैकीं असंमत वैधव्य हा एक होय. अशा अनाथ गाईच्या दुःखस्थितीपासून होणारे वाईट परिणाम ऐकून व पाहून बरेच आपणास माहीत असतील. आमच्या लोकांच्या वेड्या समजुतीमुळें त्यांस आपला सारा जन्म दुःखांत घालविणें भाग पडतें. ह्या मुळें त्यांच्या हातून वाईट परिणामही घडून येण्याचा फार संभव आहे. ईश्वर निर्मित जे शारिरिक विकार दुसऱ्यानें बळें होऊन अगर धर्म प्रतिबंधानें मोडण्याचे यत्न करविल्यास ते कधींही सिद्धीस जाणार नाहींत. जरी ते स्वतःच्या मनोनिग्रहानें कांहीं अंशीं दाबले राहातील, तरी देखील ते शरीरास इजा करूं शकतीलच शकतील. अशा आपल्या रात्रं दिवस निराशेनें दुःखांत काळ घालवीत असलेल्या बहिणींचे हृदयद्रावक स्थितीचा विचार करून लिहूं ह्मटल्यास

त्यावर एक मोठासा ग्रंथ मुद्धां होईल ह्या साठीं वेड्या समजुतीच्या चाली पासून त्यांस होईल तितकें मुक्त करून शास्त्रप्रमाणें पुनर्विवाहाची चाल सुरू करण्या साठीं यत्न करणें हें आपलें तिसरें कर्तव्यकर्म आहे.

( ४ ) मुलींचे अशिक्षित आईबाप त्यांच्या यत्किंचित्ही सुखाकडे लक्ष देत नाहींत. अर्थात् नवरा म्हातारा असो वा तरुण असो, त्याला आपला उदरनिर्वाह करण्याची शक्ति आहे किंवा नाहीं वगैरे गोष्टींकडे लक्ष न देतां, गुलामा प्रमाणें अगर गुरांढोरांप्रमाणें त्यांचा विक्रय करतात. हें फार लाजिरवाणें आहे. ह्यामुळें पुष्कळ अंशीं आपला स्त्री समूह वाईट स्थितीला येण्याची फार भीति आहे. ह्यासाठीं आपला समाज जितका सुधरेल तितका सुधारण्याचा यत्न केला पाहिजे. आतां मी कांहीं असें ह्मणत नाहीं कीं, आपणास सर्वच प्रकारें उच्चपणाचें शिक्षण मिळून स्त्रीधर्माच्या उलट रीतीनें आपण वागावें, तसें मुळींच नसून तसल्या शिक्षणापासून आपले बऱ्याच अंशीं तोटेही होण्याचा संभव आहे. ज्या अर्थी ईश्वरानें आपणा स्त्रियांस भित्रेपणा, लज्जा, सुकुमारपणा इत्यादि गुण दिले आहेत आणि शास्त्रानें स्त्री ही पुरुषाची सहचारिणी ह्मटली आहे, त्याअर्थी स्त्रीधर्माप्रमाणें वागून आपल्या समाजाची सुधारणा केली पाहिजे. हें मी माझ्या प्रिय भगिनींस सांगायला पाहिजे असें नाहीं. आतां आजपर्यंत

आपल्याप्रमाणेंच ज्या सत्पुरुषांनीं आपला समाज सुधारीत आणला व तो पुढें आणण्यासाठीं यत्न केले व जे अजूनही यत्न करीत आहेत त्यांचे आभार मानून मी आपली रजा घेतें.

**सुईण लक्ष्मीबाई**–सौभाग्यवती सुशिलाबाईनीं आज आपल्या भाषणांत ज्या सूचना केल्या आहेत त्या फारच महत्वाच्या आहेत. इतकेंच केवळ नव्हे तर, आपल्या समाजांत आजला जे अतिशयित अनिष्ट प्रकार चालत आहेत, ह्यांचें व्याख्यानद्वारा उत्तम प्रकारें दिग्दर्शन केलें आहे असें ह्मटलें पाहिजे. मघां जे मी अनिष्ट प्रकार ह्मणून ह्मटलें, ते आपले आर्य लोक रानटी स्थितींत आहेत ते सुधारले पाहिजेत किंवा पुरुषवर्गाच्या अभिमानापासून वाढले आहेत ते तोडून काढून साफ सुटें होण्यास हाच काल उत्तम आहे! तेव्हां होईल तितकें करून झटलेंच पाहिजे. असें मुळींच नसून जीं आज कित्येक शतकें आपला देश, जुलमी अविचारानें रक्तपात करणाऱ्या व प्रजेला बलात्कारानें परधर्मी करणाऱ्या परतंत्रतेंत अर्थात् ज्या कालांत शांततेचा लेशही कांहीं वर्षें साधला नाहीं. अशा धामधुमीच्या कालांत गेल्यामुळें कारणपरत्वें क्रमाक्रमानें असले अनिष्ट प्रकार वाढत चालले होते, व ते बरींच वर्षें आपल्या स्त्रीपुरुष समुदायाच्या हाडीं मासीं खिळून गेल्यामुळें निवण्यास कठीण पडत आहेत. नाहीं

तर अहिल्या द्रौपदीसारख्या कुलस्त्रिया व सुलभा मैत्रेयी सारख्या विदुषी, वसिष्ठवाल्मीकासारखे तत्ववेत्ते, कीं ज्यांची सत्कीर्ति व अनेक ग्रंथ हा कालपर्यंत जीवंत स्थितींत असून जणू कायते आपणांपुढें ग्रंथ रूपानें व कीर्ति रूपानें उभेच आहेत असें वाटतें. त्या देशाला किंवा त्यांतील समाजाला रानटी असें ह्मणतां तरीयेईल काय? सारांश 'राजा कालस्य कारणम्' ह्या ह्मणीप्रमाणें आमच्या देशांत आजपर्यंत स्थिति होऊन गेली आहे. ती सुधारणें ह्मणजे ( सर्व अनिष्ट प्रकार बंद करणें ) हें केवळ आपल्या एकट्या स्त्रीवर्गाचें काम नसून, त्याची पुष्कळ जबाबदारी पुरुषवर्गावरही आहे असें ह्मटलें पाहिजे. कारण, संसारसुधारणा झाली असतां आपली विशेष उन्नति होईल हें तत्व जाणूनच स्त्रीशिक्षणाचा प्रसार पुनः या देशांत उत्पन्न झाला; आणि यामुळेंच आज आपणास आपल्या समाजांत चाललेले अनिष्ट प्रकार दिसूं लागले आहेत. ते दूर करणें ह्मणजे आपल्या स्त्रीवर्गानें एके जागीं जमून स्त्रीधर्माला न शोभण्यासारख्या गोष्टी जितक्या न होतील तितक्याबद्दल भाषणें करणें, संसारांत पुरुषवर्गावर संसाराची जी ओढ पडते ती आपल्या स्त्रीधर्माला जागृत राहूनच पुरुषवर्गाला मदत करून कमी करणें, मुलांना सुमार्गी, विद्याभिलाषी व स्वदेशाभिमानी बनविण्यासाठीं यत्न करणें ह्मणजे 'आई' या शब्दाचें कर्तव्य पूर्णपणें बजावलें जावें, इत्यादि अनेक

महत्वाच्या गोष्टींची जी जबाबदारी आपल्या मस्तकीं आहे, तिला पूर्णपणें ओळखून आपलें काम आपण बजावीत गेलें पाहिजे, ह्मणजे आपला समाज तर काय, परंतु आपल्या देशाचेंही कल्याण होणार आहे.

(पडदा पडतो.)

**अंक ५ वा समाप्त.**

---





# अंक साहवा.

## प्रवेश १ ला.

**स्थळ**-मुंबई-बचंभटाचें घर.

**पात्रें**-बचंभटाचा मुलगा मार्तंड व गणेशशास्त्री.

**मार्तंड**—( पाय आपटीत रागानें प्रवेश करतो. ) काय पण बापानें माझ्यामागें कर्मकटकट लावून दिली आहे तरी! मी हजारदां सांगितलें कीं; माझें इतक्यांत लग्न करूं नको पण ऐकतो आहे कोण? लग्न झालें आणि ही खेंटरतोंडी घरांत आल्यादिवसापासून सुख मिळायचें तें राहिलें एकीकडेसच पण उलटें दुःख पाठीस लागलें आहे. स्वभाव काय, रीत काय, स्वरूप काय, मला तर तोंड देखील पहावेंसें वाटत नाहीं. एकदांका घरांत आलों आणि तो मुखडा दृष्टीस पडला कीं, घरादाराचा व संसाराचाही कंटाळा येतो. तिच्या हातचें पाणी घ्यायला सुद्धां मन होत नाहीं. मी तिला हजारदां सांगितलें आहे कीं, मजबरोबर भाषण करीत जाऊं नकोस पण तिच्या लोंचट स्वभावापुढें माझा नाइलाज झाला आहे. हजारदां मारसुद्धां देऊन पाहिलें. पण तिचें आपलें खरें. कितीदां घरांतून काढून ला-

विली तरी आपली अंमळशानें आहेच तयार. तसलाच तो तिचा बाप सवाई शहाणा! पहातों आतां तुझा शास्त्रीपणाचा डौल कसा आहे तो! अशा शिवाय स्वारी नीट ताळ्यावर येणार नाहीं. अस्मादिकाशीं गांठ आहे. इतके दिवस आईच्या आग्रहास्तव गप्प होतों. नाहीं तर केव्हांच लावली असती वाटेला. आतां जरीक स्वस्थ झालें खरा. असली कुरूप भिकार बायको काय कामाची? आज मला नाहीं नाहीं ह्मणतां भिक्षुकी करून आणखीं वीस रुपये पगार आहे! तेव्हां दुसरी चांगली सुरूप मनाजोगती फटाकडी बायको करून आणतों. माझ्या सारख्याला बायको ह्मणजे कःपदार्थ. आहे ( इतक्यांत गणेशशास्त्री येतो. )

**गणेशशास्त्री**—( स्वतःशींच ) काय करावें, जांवईबोवांच्या स्वभावापुढें माझा नाइलाज झाला. समजूत घालावी तरी कितीदां? पुनः आज भ्रुकुटी फिरवून, मारूनकुटून मुलीला लावून दिली. जरा मी बाहेर जाऊन घरीं येतों तोंच आली आपली रडत रडत. डोक्यांत खोंक पडल्यामुळें सगळें कपाळ व तोंड रक्तबंबाळ झालेलें. काय ही मारण्याची रीत झाली! काय ह्मणे मला ही बायको आवडत नाहीं. बापानें तर मुलीसाठीं माझ्या दारची माती कमी केली होती. ह्मटलें असो. भिक्षुकाचें घराणें असून मुलगा तरतरीत आहे. तो हा तरतरीतपणा पाजळला! आई वारल्यापासून तर स्वारीनें ताळच सोडला आहे. ज्याला

प्रत्यक्ष बहीण देखील नकोशी झाली, त्याला काय सांगणार? धन्य तो गोपाळराव व विनायकराव कीं जिच्या, हातून दुष्कर्म झालें असतांही, तें निवारण होतांच त्यांचा कांहींएक संबंध नसतां पदरच्या पैशांनीं अनाथविधवागृहांत तिची सोई केली. ( पुढें जाऊन ) ठीक झालें. स्वारी घरींच आहे. ( असें ह्मणून जवळ जाऊन नमस्कार करतो. )

**मार्तंड**–( आपल्याशींच ) ही बघा आणखी कर्मकट कट आली. आतां बरीक ह्याला चांगलें झाडलें पाहिजे. ( उठून नमस्कार न घेतां ) ( उघड ) तुह्मांला कुणी बोलावलें होतें इकडे? जर अब्रूची चाड असेल तर जा बघूं कसे निमूट परत आल्यापायीं. मी कितीदां सांगितलें आहे कीं, मला असला त्रास देत जाऊं नका ह्मणून.

**गणेशशास्त्री**–मार्तंडरावजी व्यर्थ रागावूं नका. जरा शांत व्हा. मी काय ह्मणतों तें ऐकाल कीं नाहीं? अगोदर उगीच रागें भरण्यांत काय अर्थ आहे.

**मार्तंड**–अर्थ असो वा नसो. आह्मांला कांहीं एक ऐकावयाचें नाहीं. आणि तुह्मी कांहीं सागूंही नका मजजवळ. आपले चालते व्हा कसे अगदीं निमूटपणीं.

**गणेशशास्त्री**–मग नाहींच ऐकत. जरा ऐकाल तर मजवर मोठे उपकार होतील.

**मार्तंड**–मी उपकार परोपकार कांहीं जाणत नसतों तुह्मी आपले चालते व्हा कसे!

**गणेशशास्त्री**–( स्वतःशींच ) हा तर माझें मुळींच न ऐकतां दुरुत्तरें करतो. तेव्हां बोलण्यांत कांहीं अर्थ नाहीं. ( उघड ) एकूण नाहींच ऐकत तर बसा.

**मार्तंड**–हो बसलोंच आहोंत.

**गणेशशास्त्री**–( स्वताःशींच ) आतां बरीक नाइलाज झाला खरा. मित्रमंडळीच्या ह्मणण्याप्रमाणें जर ह्या गोष्टीचा अगोदर बंदोबस्त केला असता, तर ठीक झालें असतें. आतां मात्र स्वस्थ बसून उपयोगाचें नाहीं. सामदामानें होत असलें तर पहावें. नाहीं तर न्यायकचेरीची पायरी चढणें भाग होणार आहे.

( असें ह्मणून जातो. )

---

# अंक साहवा.

## प्रवेश २ रा.

**स्थळ**–मुंबई–कृष्णशास्त्र्याचें घर.

**पात्रें**–कृष्णशास्त्री, राधाबाई कृष्णशास्त्र्याची बायको, गणेशशास्त्री.

**राधाबाई**–( सचिंत बसली असतां आपल्याशींच ) काय करावें ? मुलीचें दुःख पाहून मला असें होतें आहे कीं, एकदांचा हा जीव जाता तरी बरें होतें. तिला पाहिलें कीं, आह्मांला दुप्पट दुःख होतें. त्या दिवशीं विनायकाच्या बायकोनें मला ज्या ज्या ह्मणून गोष्टी सांगितल्या त्या त्या सगळ्या अनुभवास येत आहेत. ती मुलगी किती शहाणी

आहे ? तिचे विचार, तिचा स्वभाव, तिची रीतभात, सर्वच कांहीं कित्ता घेण्यासारखें आहे. आह्मीं शास्त्र्यांच्या बायका आहों इतकेंच. बाकी आमच्यांत तिच्यांतला काडी इतका गुण नाहीं ह्मटलें तरी चालेल. तिचें एकेक भाषण ऐकलें कीं, मनाचीं पारणीं फिटतात. एकंदरींत विनायकाला बायको चांगली मिळाली. आह्मी इतके दिवस त्याला विनाकारण दोष देऊन रुसून फुगून बसलों होतों. एवढे दिवस मलाही वाटत होतें कीं, ती शिकलेली सवरलेली आणि मोठी वाढविलेली असल्यामुळें वारंवार आमची बेअदबी करील, व अमर्यादेनें वागेल, पण आमचा समज अगदीं चुकीचा होता, असें तिनें आतां आपल्या वर्तनानें अगदीं सिद्ध करून दाखविलें आहे. घरांतलें सर्व कांहीं कामकाज मला एवढी देखील तसदी न पडूं देतां करते. घरांत आल्या दिवसापासून तिनें माझें अर्धें दुःख विसरविलें आहे. एखादवेळ विनायक टाकून बोलेल पण हिच्याकडून कधींही तसें होणार नाहीं. अहाहा! त्या दिवशीं आपल्या लोकांतील चालीरिती किती वाईट परिणाम करणाऱ्या आहेत अशाबद्दल तिनें ज्या गोष्टी सांगितल्या त्या सर्व खऱ्याच. तसेंच फावल्या वेळीं करमणुकी करतां कांहीं ना कांहीं तरी वाचून दाखवून मनाच्या शंका फेडते. मुलींचीं बाळपणीं केलेलीं लग्नें आमच्या नाशाला कशीं कारण होतात, हें माझ्या यमूसारख्या कर्मानें नाडलेल्या मुलींच्या स्थितीचें उदाहरण देऊन उघड करून दाखविलें.

खरेंच अशा मुलींचीं पुनः लग्नें केल्यानें कांहीं एक वावगें होणार नाहीं. उलटें हितच होईल. पण आमच्यांत ही रीत नसल्यामुळें कायती पंचाईत. ( विचार करून ) हो पण पंचाईत कसली? लोक हांसतील येवढेंच. पण आजपर्यंत लोक कुणाला बरें हंसले नाहींत? कसेंही वागलें तरी निंदा ह्मणून आहेच. मुली तशाच ठेवून त्यांचें वाकडें पाऊल पडलें तरी नांवें ठेवण्यास कुणी जरा देखील मागेंपुढें पाहत नाहीं. मग अशा तऱ्हेनें एकदांचा आपला उजळ माथा तरी कां करूं नये. (इतक्यांत कृष्णशास्त्री प्रवेश करतात)

**कृष्णशास्त्री**—[ विचारांत बसलेली पाहून ] तुझा इतका विचार तरी कसला चालला आहे? अग असें जर सदैव दुःख करीत बसलीस तर मला वाटतें तूं खचीत वेडी होशील.

**राधाबाई**--( एकदम दचकल्यासारखें करून ) वेडी झालें नी नाहीं झालें मिळून एकच. ह्यापेक्षां वेडांत तें दुसरें जास्त काय आहे? रात्रंदिवस मेलें दुःख तरी किती काढावें! लोकांच्या मुली लग्नावऱ्हाडांत, सणावारीं चांगले दागिने घालून, लुगडीं चोळ्या लेवून मिरवतांना तिनें पाहिलें कीं, तिचे डोळे पाण्यानें भरून येऊन आपले हुंदके देत रडत बसते. असें हें माझ्यानें कसें बरें पहावेल? आणि तिचे मनांत असें सुद्धां येत नसेल काय कीं, माझ्या आईसारख्या दुसऱ्या लेंकुरवाळ्या सवाष्णी पोक्त बायका ह्यांना बघून मी अशी फुटक्या

दैवाची ह्मणून! लोकांचे तसेंच तिच्या मैत्रिणीचे आनंदाचे सोहाळे बघून नसेल का तिचा जीव तीळ तीळ तुटत! अशी सगळा दिवस तिला दुःख करितांना बघून माझा जीव कसा बरं राहील? जळलीं आमचीं शास्त्रें नी पुराणें, आणि रीतीभाती! पुरुषांनीं मात्र हव्या तेवढ्या बायका कराव्या नी सर्व कांहीं करावें!

**कृष्णशास्त्री**—( दुःखाचा सुस्कारा टाकून स्वतःशींच ) काय करावें? नाइलाज आहे. लोकरीतीविरुद्ध चालणें मला दुस्तर आहे. परवां विनायकानें थोडे का शास्त्रार्थ काढले होते? सर्व कांहीं प्रमाणसिद्ध असून आह्मांमधील ही चाल कां व कशी बंद पडली, हें कांहीं समजत नाहीं. ज्याज्या ग्रंथांला आज आह्मीं मान देतों, त्यात्या ग्रंथांत वचनें अगदीं यथातथ्य स्पष्ट आहेत. परंतु अडचण काय ती लोकरूढीची. ( उघड ) अग तुझें ह्मणणें सर्व कांहीं खरें आहे. पण ह्मण आहेना? " यद्यपि शुद्धं लोकविरुद्धं न च करणीयं नाचरणीयं. " हीच काय ती मोठी अडचण आहे. लोकरीतीचें उल्लंघन करणें ह्मणजे किती बरें वाईट आहे? ( पड्यांतून ) शास्त्रीबोवा आहेत का घरांत?

**कृष्णशास्त्री**—कोण गणेशशास्त्रीका? आलोंहो आलों

(कृष्णशास्त्री जातात व गणेशशास्त्री आणि कृष्णशास्त्री प्रवेश करून.)

**कृष्णशास्त्री**—( नमस्कार करून ) कां, आज एवढे दुपारींच कुठें? आणि तुमच्या कामाचें काय झालें मग!

**गणेशशास्त्री**—पंच मार्फतची झालेली हकीकत आपणास विदित आहेच. ह्मणून नाइलाजानें सरकार पायरी चढणें भाग झालें. काल अर्धे अधिक काम चाललें, त्यांत आमच्या तर्फेच्या साक्षी वगैरे चांगल्या गुदरल्या. आज काय तो निकाल होईल. तेव्हां आपणाला कळवीनच. काय करणार! नशीबीं आलें खरें. जरी बचंभट पाठीस लागला होता ,तरी यथाशक्ति हुंडा देऊन सालंकृत कन्यादान केलें, त्याचाच हा मोबदला.

**कृष्णशास्त्री**—हे आदल्या जन्मीचे ऋणानुबंध आहेत. तदनुसार सर्व कांहीं घडत असतें. चाललेंच आहे. "आलीया भोगासी असावें सादर" आज दोन दिवसांत कांहींच वर्तमान कळलें नाहीं ह्मणून विनायकाला तुमच्याकडे पाठविणार होतों.

**गणेशशास्त्री**—ह्याकरतांच मी मुद्दाम इकडेस वळलों. खरेंच सांगतों शास्त्रीबोवा, मी तर या गोष्टीनें अगदीं जेरीस आलों. ( नमस्कार करून ) बरें येतों. संध्याकाळीं कळवीन आपणाला काय निकाल होईल तो. (असें ह्मणून जातो)

---

# अंक साहवा.

## प्रवेश ३ रा.

**स्थळ**-कृष्णशास्त्र्यांचें घर.

**पात्रें**-विनायकराव, आणि त्यांची बायको सुशीला.

**विनायकराव**-[ स्वतःशींच ] दिवसानुदिवस मामांच्या मनाचे कल अगदीं बदलत जाऊन त्यांस पहिल्या कृत्यांचा सर्व प्रकारें पश्चात्ताप होत चालला आहे. तसेंच आपल्या मुलीच्या दुःखद स्थितिमुळें त्यांच्या हृदयाला एकसारखी काळजी लागून राहिली आहे. उघड आहे, स्वतःच्या मुलाचा कळवळा कांहीं विलक्षण आहे. नाहीं तर जो ह्मणजे जबरदस्त महत्त्वाकांक्षी, तसाच दुराग्रही, तोच आज ह्या दुःखानें होरपळून गेल्यामुळें अगदीं दीन होऊन गेला आहे. नाहीं तर काय मजाल लागली होती पुढें चकार शब्द बोलण्याची. परंतु जसाजसा अनुभव येत चालला तसातसा विचारांतही बदल होत चालला आहे. यामुळें मनांत आणल्याप्रमाणें होणार हें खास. अडचण काय ती लोकविरुद्धतेची राहिली आहे. व तीही जाईल. परंतु यमूच्या मनाचा कल कसा काय आहे हें मात्र कळलें पाहिजे. तेवढा का जबाब मिळाला कीं झालेंच काम. ( इतक्यांत सुशीला येते. )

**सुशीला**—कां कसला चालला आहे इतका विचार.

**विनायकराव**—( दचकल्या सारखें करून ) या या, अशा उभ्या कां ?

**सुशीला**—उभी असलें ह्मणून काय झालें. मी बसेन आपली. इतका कांहीं मान नको आहे द्यायला.

**विनायकराव**—तुमच्या उभें राहण्यानें आमचे मात्र पाय दुखतात.

**सुशीला**—माझ्या उभें राहण्यानें जर आपले पाय दुखतात तर ही मी बसलें. पण मघां विचार कसला चालला होता इतका ?

**विनायकराव**—तुह्मांवर सोंपविलेल्या कामगिरीचा.

**सुशीला**—तर मजकडून होणार नाहीं असें का वाटत होतें आपणाला ? बरें तर राहिलें आमचें. आपणच करा ह्मणजे झालें.

**विनायकराव**—वाः आला ना इतक्यांत राग ? आतां कांहीं हंसायला नको आहे दुसऱ्याला बायकांना.

**सुशीला**—यांत तो मेला कसला राग आला ?

**विनायकराव**—मग सांगा पाहूं काय झालें तें ?

**सुशीला**—व्हायचें तें काय ? ह्या जगांत सुख का कुणाला अप्रिय आहे ?

**विनायकराव**—[ आनंदानें ] वाः यावरून मोठेंच काम बजावलें ह्मणायचें. बरें मग पुढें ?

**सुशीला**—मी जेव्हां युक्तीनें त्यांचे जवळ गोष्ट काढली तेव्हां तर पहिल्यानें मला बरेंच झिटकारलें नि ह्मणाल्या, वहिनी कायग तूं असें भलभलतेंच विचारतेस? ब्राह्मणांत करतात का कुणी असें? ही माझी थट्टा का करते आहेस तूं? असें पुष्कळ बोलल्या. पण जेव्हां मी त्यांची खात्री करून दिली, तेव्हां मर्यादेमुळें जरी त्यांच्यानें "हो" असें स्पष्ट ह्मणवलें नाहीं तरी, त्यांच्या किंचित् हंसऱ्या मुद्रेवरून मी तेव्हांच ताडलें. मला वाटतें आपल्या मामीबाईही ह्या कामीं मुळींच आडव्या येणार नाहींत. त्यांच्या मनाची मी खात्री खात्री करून दिली आहे.

**विनायकराव**—तिच्या विषयींची मला मुळींच काळजी नाहीं. आतां ह्या कामीं "सूत उवाच" करण्यास गोपाळरावांसच पुढें केलें पाहिजे. चला ह्या वेळीं गोपाळरावही घरींच भेटतील. तेव्हां "शुभस्य शीघ्रं." आतांच जावें हें उत्तम.

( जातो )

---

# अंक साहवा.



## प्रवेश ४ था.

**स्थळ**—मुंबई पोलिसकोर्टाजवळील रस्ता.

**पात्रें**—मार्तंड.

**मार्तंड**—( आपल्याशीं ) एवढें करून ही माझ्यामागें शेवटीं जी कटकट लागावयाची ती लागलीच. सासऱ्यानें फिर्याद करतांच वकील केला, त्यानें तर यंव करतों, त्यंव करतों, अशा हजार थापा देऊन पैसे खाल्ले व शेवटीं न्यायही आमच्या उलट!! निकाल सांगतांना मॅजिस्ट्रेट चक्क ह्मणाले कीं, "आजपासून तीन दिवसांचे आंत तुह्मी तुमची बायको आपल्या घरीं नेऊन तिला चांगल्या रीतीनें नांदवावें; तसें न होतां कोर्टापुढें पुनः फिर्याद आली तर तुह्माला चांगली शिक्षा होईल एवढेंच केवळ नव्हे तर, कोर्ट तुह्माला तिच्या अन्नवस्त्राकरतां प्रतिमहिना दहा दहा रुपये देण्यास लावील. हें पक्कें समजा" हा आणखी वर दम! काय चमत्कार तरी! आमचें अज्ञानपणीं झालेलें लग्न रद्द करून टाकावयाचें तें न होतां उलट हा न्याय. सरकारच्या हुकुमाप्रमाणें त्या खेटरतोंडीला आणणें भाग झालें खरें. असो. ग्रहदशा आपली.

( जातो. )

---

# अंक साहवा.

## प्रवेश ९ वा.

**स्थळ**—मुंबई कृष्णशास्त्र्यांचें घर.

**पात्रें**—कृष्णशास्त्री, गोपाळराव व विनायकराव.

( बसले असतां पडदा उघडतो. )

**गोपाळराव**—आपण कशाला इतके भानगडींत पडत अहां? जर शास्त्राची मोकळीक आहे तर लोकरीतीला काय ह्मणून भितां?

**कृष्णशास्त्री**—तें सगळें खरें पण, अगोदर माझा मला विचार केला पाहिजे ना?

**गोपाळराव**—यांत तो दुसरा कसला विचार करायचा?

**कृष्णशास्त्री**—( स्वतःशींच ) सर्व कांहीं यथातथ्य आहे. पण उद्यां लोक काय ह्मणतील? एक तर मी शास्त्री, आणि दुसरें तर माझ्या पूर्वींच्या सर्व मतांला अजीबात फांटा देणार. ह्यामुळें माझे जोडीदार तर काय, पण सर्व लोक मला नांवें ठेवतील. आतां पुनर्विवाह करणें हें वावगें नसून सशास्त्र आहे; तथापि प्रचारांत नसल्यामुळें अप्रसिद्ध व धर्मबाह्य होऊन राहिलें आहे.

**गोपाळराव**—कां अगदीं विचारांतसे बसलांत? मनोदेवता अनुकूल होत नाहीं वाटतें.

**कृष्णशास्त्री**——मनोदेवता काय, दोनी कडून आडवी येते. आपलें ह्मणणें शास्त्रसिद्ध आहे तथापि "शास्त्राद्रुढिर्बलीयसी" तेव्हां कसें करणार?

**गोपाळराव**—मी कबूल करतों, परंतु शास्त्रबाह्य असणाऱ्या चाली गतानुगतिक जरी चालत आल्या असल्या तरी त्या कळून आल्या असतां, जशा चट् टाकून देतों तद्वतच हा प्रकार आहे.

**कृष्णशास्त्री**—परंतु आज शतशः वर्षें बंद पडलेल्या चालींचें मजसारख्याकडून पुनरुज्जीवन करविणें ह्मणजे मोठेंच कठीण ह्मणायचें.

**गोपाळराव**—कठीण कसलें? यांतच कायती मजा आहे. एकदां असल्या कृत्यांचें आपल्या सारख्या सूज्ञ व शास्त्रसंपन्न पुरुषां कडूनच बीजारोपण झालें पाहिजे.

(इतक्यांत विनायकराव प्रवेश करतो)

**विनायकराव**—(आपल्याशींच) वः, एकूण बरेंच बेतावर आणलें. ताळा कसा जमवावा हें गोपाळरावांस मुळींच सांगावयाला नको.

**कृष्णशास्त्री**——(स्वतःशींच) मी ह्या कृत्यास अनुसरलों तर गांवात काय पण जिकडे तिकडे कल्होळ उडेल ग्रामण्य माजेल, शेवटीं बहिष्कारापर्यंतही प्रकरण जाईल. ह्यांत मुळींच संशय नको. त्यांत आमचे शास्त्री लोक ह्मणजे बहुतकरून एकमार्गी, त्यांस लांबवर नजर पोंहचवि-

ण्याची शक्ति कमी. कुठेंच कांहीं मिळेनासें झालें कीं, रूढिपरंपरेवर मजल यायचीच पण, ते असा विचार करीत नाहींत कीं, धर्मशास्त्र ह्मणजे काय, त्यांत कुठें व कसें प्रतिपादन केलें आहे, हें पाहणें ह्मणजे मोठें दुरापास्त. एखादें काव्य पढून अर्धी मुर्धी कौमुदी पाहिली ह्मणजे बनलेच शास्त्रीबोवा. आतां सर्वच असे असतील असें नाहीं तरी, धर्मशास्त्र, न्यायशास्त्र, वगैरे मोठमोठाले ग्रंथ पढूनही अंधपरंपरेला अनुसरून स्वतः अंध बनून जातात. आणि त्यांतूनही कुणी त्यांच्या पदरीं मोजून माप घालूं लागलाच तर "शेषं कोपेन पूरयेत्" ह्या न्यायाला अनुसरून चालते व्हायचें. एतावता विचार ह्मणजे काय तो त्यांच्या स्वप्नींही बसत नाहीं.

**गोपाळराव**—इतकें होऊनही पुनः पुनः विचारांतसे काय पडतां ?

**कृष्णशास्त्री**—विचार ह्मणून इतकाच कीं मी ह्या कृत्यास अनुसरलों तर लोक मला काय ह्मणतील ?

**गोपाळराव**—ह्मणणार काय तें उघड दिसतेंच आहे. शास्त्राधार दाखवून त्यांस सुविचाराचा धडा घालून देणें हें आपलें काम आहे. जे सूज्ञ असतील ते ग्रहण करतील.

**कृष्णशास्त्री**—[ स्वतःशींच ] लोक मला बहिष्कार घालतील इतकेंच ना ? चिंता नाहीं. अगोदर सर्वांस श्रुत

करून व शास्त्राचे पुरावे दाखवून मग जें करणें तें करावें. ( गहिंवरून ) पण आतां माझ्यानें नाहींच मुलीचें दुःख पाहवत! आज जी माझ्या मुलीची दुःखदस्थिति झाली आहे, तिच्याहूनही किंबहुना जास्त दुसऱ्या शेंकडो बालविधवांची होत असेल! हर हर! काय आमची रूढि व आधुनिक शास्त्रें! स्त्रियांची अशी अति नीचपणें विटंबना करावी! प्रत्यक्ष शत्रूलाही कुणी करणार नाहीं असल्या नीच प्रकारच्या हाल अपेष्टा त्या बिचाऱ्या बालविधवांस भोगाव्या लागत आहेत. त्यापेक्षां-( उघड ) तुह्मी व विनायक मिळून जें कांहीं करणें असेल तें बिनदिक्कत करा. मी कांहीं आडवा येणार नाहीं.

**गोपाळराव**–( आनंदानें ) छे छे, तें कांहीं उपयोगाचें नाहीं. आह्मांवर टाकण्यापेक्षां आपणच शेवटास नेलें पाहिजे. आह्मी बोलून चालून अल्पवयस्क. आपणासारख्या पोक्त व विद्वान् गृहस्थांकडून असल्या कृत्यांचा प्रारंभ झाला पाहिजे. ह्मणजे सर्व सुरळीत चालेल.

**कृष्णशास्त्री**–( स्वतःशींच ) करावयाचें तर खरें. मग उगीच अडून तरी कां? उघडपणें होईल तेंच उत्तम. ( उघड ) तुमच्या ह्मणण्याप्रमाणें कां होईना. ज्ञानी, अनुभवी व सत्यावलंबी असे लोक माझी कधींही निंदा करणार नाहींत. मग इतरांच्या वाग्जाळास कोण मीठ घालतो. हूँ मी तयार आहें.

**गोपाळराव**–( आनंदानें टाळी वाजवून ) विनायकरावजी आज तुमच्या एका बहिणीच्याच दुःखाचें निरसन झालें ह्मणून समजूं नका. तर दुःखरूपी पंकांत पडलेल्या हजारों बालविधवा दुःखमुक्त झाल्या ह्मणून समजा. " सत्यमेव जयते. "

( पडदा पडतो. )

---





# अंक सातवा.

## प्रवेश १ ला.

**स्थळ**—मुंबई, ठाकुरद्वारानजीकचा रस्ता.

**पात्रें**—सदाशिवभट व चक्रंभट.

**सदाशिवभट**—काय चमत्कार तरी! शास्त्री लोक सुद्धां आपला ताळ सोडीत चालले! एकंदरींत "जिकडे तिकडे कली मातला अधर्म झाला चहूंकडे" हें अगदीं खरें होत चाललें आहे. असो, गणेशशास्त्र्यांनीं चक्रंभटास बरोबर घेऊन येण्यास सांगितलें आहे त्या अर्थी त्यांजकडे जावें. (असें ह्मणून पुढें जातो तों चक्रंभट प्रवेश करतो त्यास पाहून) वः आयतेंच काम झालें. कां चक्रंभटजी, स्वारी निघाली तरी कुठें एवढ्या दुपारीं उन्हांमध्यें?

**चक्रंभट**—जरा कापडबाजाराकडे जातों आहें. पण तुह्मी कुठें निघालांत?

**सदाशिवभट**—तुमच्याकडेस गणेशशास्त्र्यांनीं मुद्दाम पाठविलें आहे, ह्मणे, चक्रंभटजींस अगदीं बरोबर घेऊन या.

**चक्रंभट**—कांहीं आहे वाटतें निकडीचें काम?

**सदाशिवभट**—काम कसलें. शास्त्री लोक देखील आपला ताळ सोडीत चालले!

**चक्रंभट**—ह्मणजे?

**सदाशिवभट**—कृष्णशास्त्री आपल्या मुलीचा **पुनर्विवाह** करणार ह्मणे!!!

**चक्रंभट**—काय? शास्त्रीबुवा आपल्या मुलीचा पुनर्विवाह करणार! ह्मणतां तरी काय?

**सदाशिवभट**—काय ह्मणजे? आश्चर्यकारकच झालें आहे.

**चक्रंभट**—आतां कांहीं राहिलें नाहीं. कलियुगाचा पुरा अंमल चालू झाला. असो. ज्याअर्थीं गणेशशास्त्र्यांनीं बोलावलें आहे त्याअर्थीं चला अगोदर त्यांकडेस.

( जातात )

---

# अंक सातवा.

## प्रवेश २ रा.

**स्थळ**—कृष्णशास्त्र्यांचें घर.

**पात्रें**—कृष्णशास्त्री, गणेशशास्त्री, चक्रंभट, शंकरभट, सदाशिवभट, गोविंदशास्त्री, इतर भिक्षुक. ( पडदा उघडतो. )

**कृष्णशास्त्री**—( आवेशानें ) शास्त्रबाह्य असेल तर दाखवा आधार. आणखीं हें पहा. ॥ "श्रुतिस्मृतिपुराणानां विरोधो यत्र दृश्यते तत्र श्रौतं प्रमाणंतु तया स्मृतिर्वरा॥"

व्यास ह्मणतात वेद, स्मृति व पुराण यांचा परस्पराशीं विरोध असला तर स्मृति प्रमाण धरावी. झालें आतां? पुराणापासून तो कात्यायन, वसिष्ठ, प्रजापति, शातातप, नारद, हारीत इत्यादि स्मृतिकारांचीं देखील वचनें दाखविलीं. आतां राहतां राहिले कायते मनु व पराशर तर ही घ्या मनुस्मृति आणि हें पहा त्याचें वचन—

" सा चेदक्षतयोनिः स्यादगतप्रत्यागतापि वा ।
पौनर्भवेन भर्त्रासा पुनः संस्कारमर्हति ॥ म० ९।१७८

भावार्थ—ती ( पतीनें टाकलेली अथवा विधवा स्त्री ) जर पतिसंग झालेली नसेल, तर दुसऱ्या पतीशीं तिचा पुनर्विवाह करणें योग्य आहे. कदाचित तुह्मी अशी शंका घ्याल कीं, " कृतेतु मानवा धर्मास्त्रेतायां गौतमाः स्मृताः ॥ द्वापरे शांखलिखिताः कलौ पाराशरास्मृताः ॥ म. स्मृ. अ. १।२४

भावार्थ—मनुस्मृतींत सांगितलेले धर्म सत्ययुगांत आचरावे, गौतमस्मृतींत सांगितलेले धर्म त्रेतायुगांत आचरावे, शंखआणि लिखित यांच्या स्मृतींत सांगितलेले धर्म द्वापारयुगांत आचरावे. आणि पराशरस्मृतींत सांगितलेले धर्म कलियुगांत आचरावे. एतदर्थ ही पहा पाराशरस्मृति ( वाचतात ) " नष्टे मृते प्रव्रजिते क्लीबे च पतिते पतौ ॥ पंचस्वापत्सु नारीणां पतिरन्यो विधीयते ॥ भावार्थ—पति नाहींसा झाला, मेला, संन्यस्त झाला नपूंसक निपजला अथवा पतित झाला, तर स्त्रीस दुसरा पति करणें विहित

आहे." या सर्व प्रमाणांवरून असें सिद्ध होतें कीं अक्षतयोनिविधवेचा ( अप्राप्तमैथुनविधवेचा ) पुन कन्येप्रमाणें: विवाह करण्यास कोणतीच हरकत नाहीं. ( चक्रंभटास उद्देशून ) कां झाली कीं नाहीं खात्री तुमची ?

**चक्रंभट**—आमची खात्री ती काय व्हावयाची आहे ! आह्मांस थोडेच अर्थ समजताहेत श्लोकांचे. शास्त्रीमंडळीची खात्री झाली कीं आमची झाली.

**गणेशशास्त्री**—सर्व कांहीं खरें आहे पण आपण एकतर पडलों ब्राह्मण आणि दुसरें तर रुढीविरुद्ध कर्म, यामुळें ब्राह्मणेतरांस आयतीच सवड सांपडणार. ते थोडकेच जाणताहेत शास्त्रार्थ.

**कृष्णशास्त्री**—ह्यावरून आपणांत ब्रह्मत्वास लांछन येण्यासारखीं कृत्यें घडतच नाहीं वाटतें? काय ह्मणतां गणेशशास्त्री तुह्मीं, अहो यःकश्चित् ब्राह्मणेतरांस का भ्यायचें? त्याची खात्री करून देण्यास कितीसें कठीण आहे. हें पहा (पुस्तक उघडून वाचतात ) उदीर्ष्व नार्यभिजीवलोकं गतासुमेतमुप शेष एहि ॥ हस्तग्राभस्य दिधिषोस्तवेदं पत्युर्जनित्वमभि संबभूथ ॥ ऋ० ॥ मं० १० सू० १८ मं.८ भाष्यम्– उदीर्ष्वेति। हे नारी त्वं इतासुं गतप्राणं एतं पतिं उपशेषे उपेत्य शयनं करोषि । उदीर्ष्व अस्मात्पतिसमीपादुत्तिष्ट । जीवलोकं अभिजीवंतं प्राणिसमूहं अभिलक्ष्य एहि

आगच्छ । त्वं हस्तग्राभस्य पाणिग्राहवतः दिधिषोः पुनर्विवाहेच्छोः पत्युः एतत् जनित्वं जायात्वं अभिसंबभूथ अत्रिमुख्येन सम्यक्प्राप्नुहि ॥ भावार्थ- हे स्त्रिये, तूं या मेलेल्या पतीच्या समीप शयन केलें आहेस तर हा जीवंत असलेल्या प्राण्यांचा समुदाय पाहून पतीजवळून ऊठ आणि इकडे ये. आणि पुर्नर्विवाह करूं इच्छिणाऱ्या पाणिग्रहण करणाऱ्या पतीच्या या ( अशा ) भार्यत्वाप्रत ( ह्मणजे बायकोपणातें ) मुख्यत्वेंकरून उत्तम रितीनें प्राप्त हो.

**गणेशशास्त्री**—( स्वतःशींच ) खरेंच. असल्या रूढि पडल्यानें पुष्कळ फायदे होतील. आणि पुनः असल्यांकडून एकदां का सुरवात झाली कीं, मग सुरळीत चालणार.

**कृष्णशास्त्री**—कां पुनः चालली का अंधपरंपरेची भूल?

**गणेशशास्त्री**—छे छे, भूल कसली? मी कांहीं आपल्या बाहेर नाहीं. परंतु चक्रंभटजी आदिकरून मंडळीचा विचार घेतला पाहिजे.

**गो० शा० व इतर**—आमचेंही मत गणेशशास्त्र्यांप्रमाणेंच आहे.

**चक्रंभट**—जिकडे तुह्मी तिकडे आह्मी. तरी पण बुवा हें मला कांहीं प्रशस्त दिसत नाहीं.

**शंकरभट**—( स्वतःशींच ) सध्यां आपण कोणताच पक्ष न धरतां अलग राहवें हेंच ठीक. ( उघड ) मी मंडळीच्या बाहेर नाहीं.

**सदाशिवभट**–शास्त्राधार ऐकून माझी खात्री झाली. मी कांहीं आपल्या बाहेर नाहीं.

**इतर भिक्षुक मंडळी**–( रागानें ) वः सदाशिवभटजी, वः अहो, मागचा पुढचा कांहीं विचार केलात का ? शास्त्री झाले ह्मणून काय झालें? ते कांहीं शंकराचार्य नव्हेत कीं, त्यांचीं वचनें सर्वांस मान्य होतील. एकंदरींत सुधारकांस हंसतां हंसतां त्यांचे अनुयायीच बनलांत ह्मणायचे. त्यांच्यापेक्षां कांकणभर जास्तच !

**शंकरभट**–( स्वतःशींच ) वः वेळ मोठी उत्तम आली, ( उघड ) मला वाटतें पहिल्यानें श्रींकडे जावें हें चांगलें.

**कृष्णशास्त्री**–( रागानें ) ह्यांत श्रींला तें काय विचारायचें ? ह्याशिवाय ते दुसरीं का शास्त्रें देणार आहेत? बालहत्यादि होत असलेले महत्पातकांचे घोंटाळे तुमच्या ब्रह्मत्वास लांछनास्पद न होतां, ते तुह्मांला इष्ट वाटावे अँ ?

**गणेशशास्त्री**–( कृष्णशास्त्र्यांस थांबविण्याच्या हेतूनें ) आ-आ-आपण जरा शा-शा-शांत व्हावें. मी-मी त्या-त्या त्यांचें स-समाधान करतों. ( भिक्षुकांस ) अहो पण कालमानावर लक्ष द्याल कीं नाहीं ? ह्या कृत्यास आज आपण जरी आडकाठी आणली तरी प्रस्तुतची आपली होतकरू प्रजा वस्तुतः हीं कृत्यें अवश्य करणारच. तशांत, शास्त्रदृष्ट्याही बाध नसतां तुमच्या दुराग्रहापासून निष्पन्न

तें काय होणार? तेव्हां "महाजनो येन गतः स पंथः" हाच न्याय उत्तम.

**भिक्षुक मंडळी**—तो तुमचा न्याय तुमच्या जवळ असूंद्या. आह्मांस त्याची कांहीं एक गरज नाहीं. श्रीपर्यंत प्रकरण लांबविलें नाहीं तोंपर्यंतच्या सगळ्या गोष्टी. ( जातात. )

**कृष्णशास्त्री**—ठीक आहे, ठीक आहे, जा श्रीकडेस. सुखेनैव जा आणि ग्रामण्य करा, बहिष्कार घाला, वाटेल तें करा. मी त्याला मुळींच भीत नाहीं.

**गणेशशास्त्री**—जाऊं द्या हो. त्यांचें काय ऐकतां? त्यांच्या हातून काय व्हायचें आहे ?

**कृष्णशास्त्री**—ह्मणूनच ह्मटलें. मी कांहीं आज ओळखितों आहें असें नाहीं त्यांस. माझ्या मनानें जें योग्य ह्मणून एकदां घेतलें त्याचा मजकडून कधींही प्रतिकार होणें नाहीं.

**गणेशशास्त्री**—पण कां ह्मणून! चक्रंभटजीसुद्धां आपल्या पक्षास किती मंडळी आहे हें पाहाल कीं नाहीं अगोदर. त्यांच्या वरदळण्यांत काय अर्थ आहे?

( पडदा पडतो. )

---

# अंक सातवा.

## प्रवेश ३ रा.

**स्थळ**-मुंबई-रस्ता.

**पात्रें**-विनायकराव व गोपाळराव.

**गोपाळराव**-आज माझ्या शंकेचें निरसन झालें.

**विनायकराव**-हें तर खरेंच पण, गोपाळरावजी एकदां का त्यांचा निश्चय झाला कीं तो कायम; तरी देखील मला एक जबरदस्त भीति होती. परंतु तीही उत्तम रीतीनें नाहींशी झाली.

**गोपाळराव**-ती कुठली, त्यांच्या जोडीदारांची वाटतें? तर तीही अनुसरली ह्या मंडळीला.

**विनायकराव**-हा मोठा लाभ झाला. असो. एकंदरींत रचलेला व्यूह उत्तम रीतीनें पार पडला.

**गोपाळराव**-चला उठा पाहूं लौकर, बापुसाहेब आपली वाट पाहत बसले असतील.

(जातात.)

# अंक सातवा.



## प्रवेश चवथा.

**स्थळ—**मुंबई, रस्ता.

**पात्रें—**सितंभट, गोविंदभट, महादेवभट व इतर मंडळी.

**सितंभट**—बहुतेक शास्त्री भिक्षुक मंडळी त्यांच्या पक्षास मिळाली आहे. तर आपणांस तरी कशाला हवा आहे वाद?

**गोविंदभट**—होय मी तरी हेंच ह्मणतों आहें, दक्षिणेला का कुठें दोष असतो. आणि कोण बसलें आहे आपणाला त्या गर्दीत बघायला. उभें का राहयचें आहे तिकडेस? हातावर दक्षिणा पडली कीं पसार!

**सितंभट**—कशाला, एवढी सुद्धां जलदी नको आहे. आलीच वेळ तर काढली आहे शक्कल. (कागद पेन्सील दाखवून) ही पहा. आमच्या मंडळीतर्फे नांवनिशी घेण्यास आलों आहें असें ह्मटलें कीं झालेंच काम!

**महादेवभट**—कां पण येवढें? नच गेलें तर नाहीं का चालायचें?

**सितंभट**—पण दक्षणा बुडेल ती खाशी छणछणीत, त्यासाठीं तर ह्या सगळ्या मसलती.

**महादेवभट**—अरे हो, ठाऊक आहे मी ओळखतों आहें तूस.

**गोविंदभट**—ह्यापेक्षां पुरतेंच शास्त्रीबोवांच्या पक्षास जाऊन मिळावें हा उत्तम पक्ष. उगाच वाद कशाला हवा?

**सर्व**—होय हें ही खरेंच. ज्याअर्थी सर्व शास्त्रीमंडळ त्यांस मिळालें आहे त्याअर्थी आपणा भिक्षुकांस तरी कशाला हवा आहे वाद? त्यापेक्षां त्यांस मिळावें हेंच उत्तम.

( जातात. )

---

# अंक सातवा.

## प्रवेश पांचवा.

**स्थळ**—पुनर्विवाहाच्या मंडपाजवळील रस्ता.

**पात्रें**—कृष्णशास्त्री ( प्रवेश करतात )

**कृष्णशास्त्री**—खरोखर [ स्वतःशींच ]आज मी कृतकृत्य झालों. मी ह्या कृत्याला पुढाकारी झालों हें ऐकतांच केवढी मंडळी मला साह्य झाली.( विचार करून) कदाचित् माझ्या मुलीप्रमाणें आकस्मिक् कालचक्राच्या फेऱ्यांत सांपडलेल्या हजारों बालविधवा दुःखांत निमग्न असतील त्यांनां दुःखमुक्त करण्यासाठींच नसेल ना हा प्रसंग मजवर आला? नाहीं तर वाण्यानें चालणारें असें शास्त्री मंडळ, तसेंच आग्रहानें तटस्थ राहिलेलें भिक्षुक मंडळ मला साह्य तरी कसें होतें? व माझ्या पूर्वीच्या विचारांत एवढें अंतर तरी कां पडावें? काय असेल तें असो. एवंच जगन्नियंत्या प्रभूचें

कर्तृत्वच कांहीं अगाध आहे. अस्तु. ज्याअर्थी हें कृत्य हातीं धरलें आहें त्याअर्थी कंबर बांधून यावज्जीव कायावाचामनेंकरून तें फलद्रूप होईलसें करण्यांस झटलें पाहिजे.

( जातात )

---

# अंक सातवा.

## प्रवेश साहवा.

**स्थळ**–पुनर्विवाहाचा मंडप.

**पात्रें**–राधाबाई, काशीबाई, सुशीला, यमुना, दामूअण्णा, गोपाळराव, विनायकराव, कृष्णशास्त्री, बापुसाहेब, गणेशशास्त्री, चक्रंभट, व इतर भिक्षुक मंडळी.

( राधाबाई व काशीबाई भेटत असतां पडदा उघडतो )

**राधाबाई**–आजपासून यमुना माझी नाहीं, तुमची आहे ह्मणून समजा.

**काशीबाई**–हें काय ह्मणणें झालें? माझी सुशीला नाहीं का तुमच्या पदरांत. मुली काय नि सुना काय सारख्याच. सुनांना नीट रीतीनें वागवणें हें त्यांच्या हितापेक्षां पुष्कळअंशीं आपल्याच हिताचें आहे. (कृष्णशास्त्री व बापुसाहेब वगैरे येतात.)

**कृष्णशास्त्री**–( स्वतःशींच ) अहाहा! काय हा आनंदाचा दिवस? ईशकृपेनें माझी यमुना वैधव्यरूप कालस-

र्पाच्या विषरूपी दाढेपासून मुक्तच झाली ह्मणायची. ( जवळ जाऊन यमुनेला पोटाशीं धरून ) ( उघड ) खरोखर मीं तुह्मां सर्वांचा फार आभारी आहें. नाहीं तर हा आजचा आनंदाचा दिवस मला मुळींच दिसला नसता.

**बापूसाहेब**— छे छे काय हें ? हे आपले महत् उपकार आह्मावर तर काय परंतु सर्व आर्य भगिनींवर झाले आहेत व आणखीं होतीलही.

**गोपाळराव**—याप्रमाणें जर आमची धर्माधिकारी मंडळी धर्मतत्वांचें सत्यावलंबन करून वर्तेल तर ईशकृपेनें पुनः आमच्या देशाची उन्नतावस्था झाल्यावांचून कधींही राहणार नाहीं.

**कृष्णशास्त्री**—ह्यांत काय संशय. खरोखर आमच्या प्राच्य मुनींनीं केलेल्या उत्तम उत्तम नियमांचा आज अगदीं विपर्यास होऊन गेला आहे. फार काय सांगू? उपनयना सारख्या महत्वाच्या विधींचा देखील निवळ तमाशाच झाला आहे ! विद्यार्जनाकरितां उपनयन संस्कारांत " **द्वादशवर्षाणि ब्रह्मचर्यं चर** " ही बटूला त्याच्या पित्याची शास्त्रोक्त आज्ञा ह्मणजे काय? आणि चार घटिकांनीं **समावर्तन** करून गृहस्थाश्रमी होणें ह्मणजे काय? विद्यार्जनास ब्रह्मचर्य हें शरीर रक्षणाचें उत्तम साधन होय. वैद्यशास्त्रांत ह्मटलें आहे:—**ऊनषोडशवर्षायामप्राप्तः पंचविंशतीम् ॥ यद्या धत्ते पुमान्गर्भं कुक्षिस्थः सवि-**

पद्यते ॥ १ ॥ जातोवानचिरज्जीवेज्जीवेद्वा दुर्बलेन्द्रियः तस्मादत्यंतबालायां गर्भाधानं न कारयेत् ॥ २ ॥ ( सुश्रुते शारीरस्थाने अ० १० ) सोळावर्षांहून कमी वर्षांच्या स्त्रियेबरोबर पंचवीस वर्षांहून कमी वर्षांच्या पुरुषाशीं संगम झाल्यास कुक्षिस्थ गर्भ विपत्ति भोगून पूर्ण मास न होतां पतन पावेल. कदाचित् पूर्ण मासपर्यंत राहिलाच तर तो प्राणी दीर्घायु, बलवान् असा न होतां रोगी असा राहील. ह्मणून बाल्यावस्था असेपर्यंत गर्भादान करूं नये. हे वैद्यशास्त्रकाराचे विचार आमच्या धर्मशास्त्राशीं किती जोडते आहेत! परंतु विचार करतो कोण? ज्या स्मृतींत वैद्यशास्त्राच्या विचारांस अनुकूल असे आधार आहेत, त्याच स्मृतींत ( मनुवगैरेंत) निवळ वैद्यशास्त्रास तर काय, परंतु सर्व स्मृतींच्या आधारांची एकवाक्यता केल्यास, अगदीं विरुद्ध दिशा दाखविणारे **अष्टवर्षाभवेद्गौरी ॥ नव वर्षातु रोहिणी ॥ दशवर्षाभवेत्कन्या ॥ अतऊर्ध्वं रजस्वला ॥ १ ॥ माताचैव पितातस्या ज्येष्ठो भ्राता तथैवच ॥ त्रयस्ते नरकं यान्ति ॥ दृष्ट्वांकन्यारजस्वलाम् ॥** ह्मणजे कन्या आठवर्षांची झाली असतां तिला गौरी ह्मणावी, नववर्षांची झाली कीं तिला रोहिणी ह्मणावी आणि दहावर्षांची झाल्यानंतर तिला रजस्वला ह्मणावी. यासाठीं तिच्या आईनें बापानें व तिच्या वडील बंधूनें तिला पाहूं नये. पाहिली असतां त्यांस नरकवास प्राप्त होतो. केवढा

चमत्कार! खरोखर असले श्लोक ह्मणजे आमच्यासारख्या शास्त्र्यांनीं ह्मणा किंवा भिक्षुकांनीं ह्मणा बेदिक्कत स्मृति ग्रंथांत घुसडून दिले आहेत. व त्यांवर कांहीं काल लोटल्यामुळें, त्यांचा सर्वत्र प्रसार होऊन आज ते जगमान्य बनले आहेत. परंतु केवढा अविचार आहे कीं, "**काममा मरणात्तिष्ठेद् गृहे कन्यर्तुमत्यापि ॥ नचैवेनां प्रयच्छेत्तु गुणहीनाय कर्हिचित्** ॥ (मनुस्मृ० अ० ९,८९) मनु ह्मणतो, कन्येला मरणावस्थेपर्यंत कौमार्यव्रत धारण करवावें लागलें तरी चिंता नाहीं, परंतु असदृश अर्थात् परस्पर विरुद्ध गुणकर्मस्वभावी स्त्रीपुरुषांचा विवाह कधींही करूं नये. एथपर्यंत जेथें विचार सांगितले गेले आहेत तेथें "अष्टवर्षा भवेत्कंन्या" अशा श्लोकांचा समावेश होईल तरी कसा! तसेंच "**संतुष्टो भार्यया भर्ता, भर्त्रा भार्या तथैवच ॥ यस्मिन्नेव कुले नित्यं कल्याणं तत्र वै ध्रुवं** ॥ (मनुस्मृ० ३।६० आणखी मनु ह्मणतो. जेथें परस्पर स्त्रीपुरुष आनंदित राहतील तेथें सदैव आनंद, लक्ष्मी, व कीर्ति यांचा वास असतो. व ह्याच्या उलट वर्तन असल्यास तेथें दुःख, दारिद्य, आणि निंदा ह्यांचा वास असतो. ह्या उदात्त विचारास मागें सारून "अष्टवर्षा भवेत्कंन्या" अशा आधुनिक व घुसडलेल्या श्लोकास पुढें केल्यामुळें त्याचे परिणाम आज आह्मांस भोगावे लागत आहेत. नाहीं तर विवाहासारख्या महत्वाच्या कृत्यांत परस्परांकडून पंचमहाभूतांच्या साक्षीनें चतुर्विध पुरुषार्थाच्या शपथा होणें, व तदनुसार वर्तणें हें

कर्म अज्ञान वधुवरांस समजणार कसें ? व पुढें त्या त्यांच्या हातून योग्य पाळल्या जाव्या कशा? ह्यासाठीं मुलींना सुशिक्षण व धर्मशिक्षण देणें हें योग्य आहे. सारांश, आमच्या प्राक्कालीन आर्यांची व त्यांच्या स्त्रियांची योग्यता प्राप्त करून घेण्याची सुधारणा करणें हें आह्मांस इष्ट असून हल्लीं प्रचलित असलेल्या चाली, अर्थात् वृद्धानें अल्पवयस्क कन्येशीं विवाह करणें, कन्याविक्रय, बाललग्न, इत्यादि अनिष्ट व शास्त्रबाह्य गोष्टी बंद करण्यास आह्मांस अवश्य झटलें पाहिजे. तसेंच आमच्या धर्माधिकारी मंडळींनेंही धर्मशास्त्राचें उत्तम प्रकारें निरीक्षण करून बृहस्पती ह्मणतो, त्याप्रमाणें ह्मणजे **युक्तिहीने विचारेतु धर्महानिप्रजायते**–युक्तिशिवाय आपल्या बुद्धीचा उपयोग करून धर्महानि होऊं नये ह्मणून कालमानानुरूप योग्य त्या गोष्टींची शास्त्रदृष्ट्या मुभा देणें हेंच योग्य होय. ( बापुसाहेबांस ) कां असेंच कीं नाहीं ?

**बापुसाहेब**–ह्याशिवाय दुसरें तें काय पाहिजे आहे ?

**कृष्णशास्त्री**–( यमुनेला ) बाळे! इकडे ये. तुझ्या दुःखाचें निरसन करण्यास धैर्यानें साह्य झालेल्या या ब्रह्मवृंदांत नमस्कार कर.

**सुशीला** आज असा एकट्यांनीं नाहीं बरं जोड्यांनींच झाला पाहिजे.

**गो० वि०**–अण्णा, व्हा पुढें लाजतां काय असे.

( नमस्कार करितात. )

### श्लोक–शार्दूल विक्रीडित.

॥ ब्रह्मा विष्णु महेश चंद्र सविता तैसा गणांचा पती ॥
॥ दिक्पालांसह इंद्र मंगल करो देवो तुह्मां संतती ॥
॥ कीर्तीचा ध्वज नित्य द्वारिं फडको धैर्यद्रुमाचे वरी ॥
॥ सौभाग्यान्वित लक्ष्मि नित्य सुखदा होवो तुह्मां भूवरी

यापेक्षां अणखीं तें काय प्रिय व्हायचें.

**कृष्णशास्त्री**–तरी हें असोः--

### श्लोक–स्रग्धरा.

गेल्या वैधव्यपंकीं रुतुनि अमित ज्या दीन बाला तयांला॥
काढायाला धजो हा गुणिजन पुनरुद्वाह लावावयाला ॥
लाभो स्वातंत्र्य लोकां अशिवजननि ही रूढि भंगोनि जावो
वाढोनी नीतिमत्ता निजजन फिरुनी उन्नति स्थान पावो॥

**सर्व**–तथास्तु.

**कृष्णशास्त्री**–ज्याअर्थी त्या जगनियंत्या परमेश्वरानें आज हा आनंदाचा दिवस दाखविला आहे त्याअर्थी त्याची प्रार्थना करण्यास विसरतां कामा नये.

### भरतवाक्य.

पद. राग भैरवी, ताल दादरा.

॥ देई अह्मां हेंचि प्रभो वरप्रदान दे ॥
॥ वाढुनियां नीति जनीं राग-द्वेष टाकुनि, मनीं ॥
॥ मित्रभाव धरुनि सदां आर्य वसों दे ॥ १ ॥
॥ सृष्टिवरी वृष्टि करुनि धनधान्यें विपुल अवनी ॥
॥ होउनियां तुष्ट आर्य होति हेंचि दे ॥ २ ॥ दे० ॥

---

# पुरवणी

विधवा पुनर्विवाहाविषयीं ज्या महर्षींची अनुज्ञा आहे असें अंक ७ वा, प्रवेश २ दुसरा, पृष्ट १४१।४२ ह्यांत झटलें आहे. त्यांचीं वचनें:-

**सतु यद्यन्य जातीयः पतितः क्लीब एवच ॥**
**विकर्मस्थः सगोत्रोवा दासो दीर्घामयोऽपि वा ॥**
**ऊढापि देया सान्यस्मै सप्रावरण भूषणा ॥**

( कात्यायन. )

**भावार्थ**—अन्य ज्ञातीचा, बाटलेला, नपूंसक, विरुद्धकर्म करणारा, सगोत्र, दास, दीर्घरोगी-अशा पतीबरोबर विवाह झाला असला तर ती स्त्री वस्त्रभूषणांसहवर्तमान दुसऱ्या पतीस द्यावी.

**कुलशील विहीनस्य षंढादि पतितस्यच ॥**
**अपस्मारि विधर्मस्य रोगिणां वेषधारिणाम् ॥**
**दत्तामपि हरेत्कन्यां सगोत्रोढां तथैवच ॥**

( वसिष्ट. )

**भावार्थ**—ज्याचें कूल अथवा शील हीन आहे, जो नपूंसक, बाटलेला, अपस्मार रोगी, विरुद्ध कर्माचा, दीर्घ रोगी व सोंग घेणारा, यांस विवाह करून दिलेली कन्या परत घेऊन ( पुनः दुसऱ्यास द्यावी ) सगोत्रपतीशीं विवाह झालेली कन्याही ( दुसऱ्या पतीस द्यावी. )

**यदिसाबालविधवा बलात्यक्ताथवाक्काचित् ॥**
**तदाभूयस्तु संस्कार्या गृहित्वा येनकेनचित् ॥**

( प्रजापति )

**भावार्थ**—ती स्त्री जर बालविधवा अथवा पतीनें बलात्कारानें टाकलेली अशी अक्षता असेल, तर तिचें ग्रहण करून तिशीं पुनर्विवाह कोणीही करावा.

**वरश्चेत्कुलशीलाभ्यां नयुज्येत कदाचन ॥**
**न मंत्राः कारणं तत्र नच कन्या नृतं भवेत् ॥**

समास्छिद्यंतु तांमकन्या बलादक्षत योनिकाम् ॥
पुनर्गुणवते दद्यादितिशातातपो ब्रवीत् ॥
हीनस्य कुलशीलाभ्यां हरक्कन्या न दोषभाक् ॥
न मंत्रा कारणं तत्र नच कन्या अनृतं भवेत् ॥
( शातातप )

**भावार्थ**—नवरा कुल व शील यांनीं हीन असल्यामुळें कन्येस योग्य नसल्यास त्यांच्या विवाहांत मंत्रप्रयोग झाला तो व दान झालें तें हें सर्व अगदीं व्यर्थ होय. त्या अक्षत कन्येस बलात्कारानें परत घेऊन दुसऱ्या गुणवान् वरास पुनः द्यावी असें शातातप ह्मणतो. कुल व शील यांनीं हीन जो पति त्यास दिलेली कन्या त्याजपासून परत घेतली असतां दोष नाहीं. मंत्रप्रयोग व कन्येचें प्रत्यक्षदान या गोष्टी तेथें ( कन्या परत घेण्यास ) प्रतिबंधक होत नाहीं.

उद्वाहितापि साकन्या नचेत्संप्राप्तमैथुना ॥
पुनः संस्कार मर्हत यथा कन्या तथैवसा ॥

**भावार्थ**—कन्येचा विवाह झाल्यानंतरही तिचा पतीशीं संग झाला नसेल तर ( आपत्तीच्या प्रसंगीं ) तिचा पुनर्विवाह करावा. कारण जशी अविवाहित कन्या तशीच ती होय.

ईर्षा षंढा दयोन्येच चत्वारः समुदाहृता ॥
त्यक्तव्यास्ते पतितवत् क्षतयोन्या अपिस्त्रिया ॥
अक्षिप्त मोघबीजानां कृतेपि पतिकर्मणि ॥
पतिरन्यः स्मृतोनार्या वत्सरार्ध प्रतीक्षतु ॥
अन्यस्यां यो मनुष्यः स्यादमनुष्यः स्त्रयोषिति ॥
लभेत सान्यं भर्तार मेतत्कार्यं प्रजायते ॥

**भावार्थ**—ईर्षा षंढ, सेव्य वातरेता, व मुखभग हे चार प्रकारचे नपूंसक सांगितले आहेत त्यांचा पतिताप्रमाणेंच त्याग करून दुसरा पति करावा. आक्षिप्त व मोघबीज हे जे दोन नपूंसक असतात त्यांजकडून गर्भादान संस्कार झाला असला तरी त्यांची ( सुधारण्याची) सहा महिने वाट पाहून स्त्रीस दुसरा पति करणे विहित

आहे. ज्या मनुष्यास अन्य स्त्रीच्या ठिकाणीं मात्र पुरुषत्व असतें व स्वस्त्रीच्या ठिकाणीं पुरुषत्व असत नाहीं त्या नवऱ्याच्या बायकोस दुसरा पति करावा हें ब्रह्मदेवास इष्ट आहे. ( नारद. )

( गोविंदार्णवांतील गद्यहारीत )

**आसना भिवादनो त्थाना तिथ्यानि धर्म साधनानि साधूनाम् । एतेषांप्रदाने कन्याया व्यतिक्रमो न विद्यते अन्यत्र याथातथ्यात् । क्लीबपतित प्रोषित प्रव्रजित प्रमितेषु तु मिमांसंते । नोदकेन नवा वाचेति प्रजापतिः अतस्तां चेतप्रति गृण्हीत तस्य दद्यादित्येके मंन्यंते तन्न अकृत्स्नाविधानात् । पाणि ग्रहण मंत्रैरित्यपरे तत्रापि सख्या भावात् न पाणिग्रहणमात्रेण जायां जानीयात् । कृत्स्नंहिसप्तमे पदे "जायापतित्वमिति" ॥** ( हारीत. )

**भावार्थ**—कन्या मागण्यास येणारांस आसनादिक दिलीं तरी ते सभ्यतेचे साधारण धर्मच आहेत. यास्तव ते दिल्यावरही पूर्ण विवाह झाला नसल्यास दुसऱ्यास कन्या दिली तर तेणें करून धर्माचा अतिक्रम होत नाहीं. नपुंसक, पतित, नष्ट, संन्यस्त व मृत यांविषयीं मात्र याहून निराळा विचार आहे. ( ह्मणजे पूर्ण विवाह झाल्या नंतरही अन्य पतीस देण्याविषयीं निरानिराळ्या स्मृतिकर्त्यांची मतें आहेत ) उदक पूर्वक दानानें अथवा वाग्दानानें ( पतित्व येत नाहीं ) असें प्रजापति ह्मणतो. यास्तव कन्येचा ज्यानें प्रतिग्रह केला त्यासती द्यावी असें कोणी ह्मणतात तें ( बरोबर ) नाहीं कारण सर्व विवाह विधी ( त्या दानांनीं ) पूर्ण होत नाहीं. पाणिग्रहण मंत्रांनीं ( त्या विधीची पूर्ती ) होते असें कोणी ह्मणतात परंतु त्यानेंही सख्य होत नाहीं. यास्तव केवळ पाणिग्रहणानें भार्या होत नाहीं तर पूर्ण जायापतित्व सप्तमपदीं येतें.

यांत मनु व नारद यांनीं सांगितलेल्या नष्टादि पांच आपत्तींच्या प्रसंगीं हारीत ऋषीनेंही विवाहितेचा पुनर्विवाह अन्य संमतीनें सांगितला आहे.

---

# दक्षिणाप्राईज कमेटीकडून मिळालेले अभिप्राय.



## रावबहादूर न्यायमूर्ति महादेव गोविंद रानडे

यांचा अभिप्राय.

**सद्यस्थित्यादर्श नाटक** अर्थात् आजची आमची सामाजिक स्थिति-हें पुस्तक वाचून पाहिलें. सद्यस्थितीचें प्रतिबिंब ग्रंथकर्त्यानें ह्या पुस्तकांत चांगलें दाखविलें आहे. नवीन विचारांस अति विरुद्ध असे कोणी एक शास्त्री ह्या नाटकांतील मुख्य पात्र असून दुसरें मुख्य पात्र त्यांचाच भाचा नवीन विचारास अनुकूल असा योजिला आहे. भाच्यानें प्रौढवयस्क कन्येशीं विवाह केला आहे. शास्त्रीबोवांची एकुलती एक कन्या अल्पवयस्क असतांना तिचें एका लहान मुलाशीं लग्न झालें होतें. तो मुलगा वयांत येण्यापूर्वीं निवर्तला. ह्यामुळें ती कन्या बालविधवा झाली. तें दुःख शास्त्रीबोवांस दुःसह होऊन सासरच्या माणसांकडून तिला जाचणूक होऊं लागल्यामुळें व तिचें केशवपन होण्याच्या संधीस शास्त्रीबोवांच्या भाच्यानें तिला सोडविलें. व पुढें शास्त्रीबोवांचे विचार फिरून त्यांच्या अनुमोदनानें तिचा द्वितीय संबंध झाला. हा नाटकांतील मुख्य विषय आहे. वृद्ध पुरुषाबरोबर अल्पवयस्क मुलीचा विवाह, कन्याविक्रय झाल्यानें काय अनर्थ होतात तेंही ह्या ग्रंथांत दाखविलें आहे. नवीन विचारांचें मंडन व जुन्या आग्रहाचें खंडन पात्रांकडून चांगलें झालें आहे. अभद्र व अश्लील प्रकार पुस्तकांत कोठें आढळण्यांत आला नाहीं. एकंदरींत कमेटीच्या आश्रयास पुस्तक पात्र आहे असा इकडील अभिप्राय आहे. ग्रंथकर्त्यास १०० रुपये पर्यंत बक्षीस देण्यास हरकत नाहीं.

## रावबहादुर विष्णु बाळकृष्ण सोहोनी पुणें ट्रेनिंग कालेजचे माजी प्रिन्सिपॉल व डेक्कन व्हर्न्याक्युलर ट्रान्सलेशन सोसायटीचे चिटणीस, पुणें, ह्यांचा अभिप्राय.

एकंदरींत सदर्हू पुस्तक पाहिलें असतां तें चांगलें लिहिलें आहे असें ह्मटल्यावांचून माझ्यानें राहवत नाहीं. त्याची भाषा, त्यांतील विचार व लिहिण्याची शैली पाहिली असतां, तें लिहिण्यामध्यें ग्रंथकर्त्यानें चांगले परिश्रम घेतले आहेत असें ह्मटलें पाहिजे. हल्लीं सासवा आपल्या सुनांस व नणंदा आपल्या भावजयांस कशा वागवितात, गतभर्तृकांच्या व हिंदुधर्माभिमानी पुरुषांच्या मनांत पुनर्विवाह न करण्यापासून होणारे तोटे व ते केल्यापासून होणारे फायदे, याविषयीं विचार कसे येतात, व पुनर्विवाहाची चाल ब्राह्मण ज्ञातींत नसल्यामुळें ब्राह्मण ज्ञातींतिल विधवांस कशीं दुःखें व संकटें भोगावीं लागतात याचें यथार्थ वर्णन ह्या पुस्तकांत केलें आहे. व यास " **सद्यस्थित्यादर्श** " जें नांव दिलें आहे तें अन्वर्थक आहे. त्याचप्रमाणें जुन्या मतांचें खंडन व नव्या मतांचें मंडन चांगल्या रीतीनें व साधार केलें आहे. मराठींत कोणत्याही पुस्तकाचें भाषांतर करण्यापेक्षां स्वतःच्या कल्पनेनें नवीन पुस्तक लिहिणें हें अधिक श्रेयस्कर आहे असें मला वाटतें. सबब या गोष्टीकडे लक्ष्य देऊन ग्रंथकर्त्यास १५० रुपये पर्यंत बक्षिस द्यावें असें माझें मत आहे.

* * * *

## नारो भास्कर देवधर माजी एज्यूकेशनल इनस्पेक्टर यांचा अभिप्राय.

सोबतचें नाटक वाचून पाहतां प्रस्तूतच्या स्थितीचें स्वरूप चांगल्या रीतीनें मनांत भरविण्यास विषयाची योजना चांगली केली आहे. याबद्दल रावबहादूर सोहोनींनीं जो अभिप्राय दिला

आहे तो बरोबर आहे. त्याची पुनरुक्ति करावी असें मला वाटत नाहीं. कारण, त्यांचा व माझा अभिप्राय एकच आहे. ह्मणून त्यांनीं लिहिलेला अभिप्राय तोच माझा आहे असें समजावें. एकंदरीनें पुस्तक वाचण्यास चांगलें आहे. ह्मणजे त्यांतील विषयांचें प्रतिबिंब मनावर चांगलें उठणारें आहे. तथापि ग्रंथकर्त्यानें पात्रांची रचना ज्या त्या प्रवेशांत योग्य करून व्यवस्थेशीर छापून प्रसिद्ध केल्यास १०० रुपये पर्यंत बक्षिस द्यावें असें माझें मत आहे.

* * * *

**डाक्टर रामकृष्ण गोपाळ भांडारकर, सी. आय्. ई.** मुंबई युनिव्हर्सिटीचे व्हाईस चान्सलर व डेक्कन व्हर्न्याक्यूलर ट्रान्सलेशन सोसायटीचे अध्यक्ष ह्यांचा बक्षिसाबद्दल हुकूम.

एकशें पंचवीस रुपये ग्रंथकर्त्यानें एक वर्षाचे आंत पुस्तक छापून प्रसिद्ध करावें या अटीनें द्यावे. ता. १५ जानेवारी १८९६.

* * * *

## इतर विद्वानांचे आलेले अभिप्राय.

### सोकर बापूजी त्रिलोकेकर ट्रान्सलेटर, हायकोर्ट, मुंबई, यांचा अभिप्राय.

रा. रा. हरी रामचंद्र पाठक यांनीं रचिलेलें सद्यस्थितीलादर्श नाटक मी साद्यंत वाचलें. या नाटकाचें संविधानक स्वकल्पित असून सद्यस्थितीला अनुसरून असें आहे. व अमुक व्यक्तीला लागू आहे असें नाहीं. भाषा चटकदार, शुद्ध, व यथोचित असून प्रत्येक पात्राच्या मनोविकारांचें हुबेहुब चित्र दाखविलें आहे. या नाटकाच्या परिशीलनानें वाचकांच्या मनावर ठसा उमटल्यावांचून राहणार नाहीं अशी माझी पूर्ण खात्री आहे. परंतु त्याच्या प्रयोगदर्शनानें त्यापेक्षां जास्त ठसा उमटण्याचा संभव आहे. या नाटकांत संसारांतील जे दोष दाखविले आहेत ते अनुभवसिद्ध आहेत ह्मणून ते पाहून लोक आपली सुधारणा करून घेतील तर खरोखरींच देशाचें कल्याण होणारें आहे. ता. २० मार्च १८९६.

---

## वेदशास्त्रसंपन्न वेदमूर्ती नरहर विष्णु गोडसे शास्त्री
यांचा अभिप्राय.

आपलें 'सद्यस्थित्यादर्श नाटक' वाचून पाहिलें. त्याची भाषा, विचार लिहिण्याची शैली, व संविधानक पाहिलें असतां उत्तम असून पुस्तकास दिलेलें नांव अन्वर्थक आहे. हें पुस्तक सामाजिक सुधारणेच्या कामीं बरेंच विचारणीय असून असलीं पुस्तकें जितकीं जास्त निपजतील तितकीं पाहिजे आहेत असें ह्मटल्यावांचून माझ्यानें राहवत नाहीं.

*　　*　　*　　*

## केशव कुशाबा आचार्य जे. पी. यांचा अभिप्राय.

आपलें पुस्तक साद्यंत वाचलें. आपला पुस्तक लिहिण्याचा हा पहिलाच प्रसंग असून उत्तमप्रकारें सिद्धीस गेला ह्याबद्दल आनंद वाटतो. आपली लिहिण्याची शैली साधी, सरळ व स्पष्ट असून विशेष सुधारण्यालायक आहे. कित्येक लोक इंग्रजीभाषेंतील कठीण ह्मणींचा उपयोग मराठी भाषेंत आणण्याकरितां ओढून ताणून भाषांतर करतात. तो दोष आपल्या पुस्तकांत नाहीं ही आनंदाची गोष्ट आहे. सारांश पुस्तक वाचनीय असून त्यांतील विषय प्रतिपादनार्थ दिलेले शास्त्रार्थ सयुक्तिक आहेत.

---

छापत आहे.

# गंगागोविंदसिंह,

अथवा

## वारन हेस्टिंग्सचा उजवा हात.

(एक ऐतिहासिक कादंबरी.)

ता० ३० [illegible]पर्यंत आगाऊ पाठविणारांस किंमत १ रुपया. वरील मुदतींत आगाऊ सही पाठविणारांस किंमत १॥ रुपया मागाहून किंमत दोन रुपये पडेल.

पुस्तकाचीं पृष्ठें सुमारें ४०० होतील. छापणी व बांधणी फारच सुरेख केली आहे. आगाऊ सही खालील पत्त्यावर पाठवावी.

मानेजर, शारदाप्रमोहन छापखाना गिरगांव मुंबई. | बी. जी. वझे आणि मंडळी गिरगांव पोष्ट, मुंबई.

---

☞ ह्याशिवाय सर्व प्रकारचीं इंग्रजी, मराठी, व गुजराथी पुस्तकें, आमचेकडे विकत मिळतील. आगाऊ किंमत पाठविली असतां मराठी व गुजराथी पुस्तकांना टपालखर्च पडणार नाहीं. व्ही. पी. नेंही पुस्तकें पाठविलीं जातील. अर्धा आणा पाठविला असतां पुस्तकांची यादी फुकट पाठवूं.

बी. जी. वझे आ. मंडळी.